प्रकाशक
रा. ज. देशमुख
देशमुख आणि कंपनी
१९१ शनवार, पुणें २.

• • •



• • •

मुखपृष्ठावरील चित्र
दीनानाथ दलाल

• • •

प्रथमावृत्ति :
सप्टेंबर १९५२

• • •

मुद्रक
न. वि. सरदेशपांडे
आदर्श मुद्रणालय
३९५।५ सदाशिव, पुणें २.

• • •



• • •

## नवीं प्रकाशनें

प्रीतीचा शोध

वि. स. खांडेकर

किनारा

कुसुमाग्रज

जाई

विभावरी शिरूरकर

स्वप्नांतरिता

ग. त्र्यं. माडखोलकर

• • •

# जान्हवी

## १

महाराष्ट्राच्या उत्तर भागामध्यें एक डोंगरांची रांग आहे. नाशिक जिल्ह्यांतील चांदवड या गांवाजवळ असलेल्या घाटामध्यें या रांगेचा प्रारंभ होतो आणि सुमारें पंचवीस तीस मैलांच्या अंतरावर सप्तशृंगाच्या प्रसिद्ध डोंगराजवळ तिची समाप्ति होते. या रांगेंतील सर्वच पर्वतशिखरें उंच, विशाल आणि परस्परांना खेटून बसलेलीं अशीं आहेत. माथ्यावरील पठारांवर उत्तुंग पहाड घेऊन बसलेले हे डोंगर दुरून पाहिले म्हणजे अंबाऱ्या लावून सिद्ध असलेले कांहीं हत्तीच एका रांगेंत उभे राहिलेले आहेत असा भास होतो. प्रत्येकाचा विस्तार मोठा, पण त्यांत अस्ताव्यस्तपणा नाहीं. इतरत्र आढळतो त्याप्रमाणें मोठ्या डोंगराच्या जवळपास लहानसहान टेकड्यांचा पसाराहि तेथें दिसत नाहीं. सामान अंगाखांद्यावर घेऊन, आगगाडीची वाट पहात फलाटावर उभ्या असलेल्या प्रवाशांप्रमाणें सारे डोंगर व्यवस्थितपणें खडे आहेत. या रांगेंतील सप्तशृंग आणि धोडप हे दोनच डोंगर धार्मिक आणि ऐतिहासिक कारणांमुळें बाहेरच्या लोकांना ऐकून ठाऊक असतील. सप्तशृंगाची देवी ही अनेक घराण्यांची कुलदेवता असल्यामुळें त्यांतहि या डोंगराची प्रसिद्धी विशेष. बाकीचीं शिखरें त्या मानानें अगदींच अज्ञात आहेत. त्यांच्यावर चढून जाण्याचे मार्गहि फार दुर्घट आणि त्यामुळें माण-

सांची रहदारीहि कमी. कित्येकांत तर ती अजिबातच नाहीं असें म्हटलें तरी चालेल.

अशाच एका अज्ञात अथवा अप्रसिद्ध डोंगरावर कांहीं मित्रांसमवेत जाण्याची संधि मला कांहीं दिवसांपूर्वी मिळाली. शेलारवाडी नांवाच्या एका खेडेगांवापासून सुमारें चार मैलांच्या अंतरावर हा डोंगर असून त्याचें स्थानिक नांव रणकाईचा गड असें आहे. रणकाई हा रणकालीचा अपभ्रंश आहे. तिकडच्या पांढरपेशा समाजांत रणकाली हें नांवच विशेष प्रचारांत आहे. शेलारवाडीस आमच्यापैकीं एकाची थोडी शेतीवाडी होती व एक छोटेसें घरहि होतें. त्याच्या बरोबर शेलारवाडीला जावयाचें आणि तेथील निसर्गरम्य वातावरणांत आठ-पंधरा दिवस काढावयाचे असा बेत आम्हीं गेलीं कित्येक वर्षे आंखीत होतों.

या वर्षीं आमचा हा बेत अखेरीं तडीला गेला. रेल्वे, मोटार आणि बैल-गाडी या तिन्ही साधनांचा उपयोग करून आम्ही शेलारवाडीला जाऊन पोहोंचलों. शेलारवाडीच्या वाटेवर असतांना रणकालीचा गड वेगवेगळ्या आकारांत आम्हांला दिसत होता. वाटेचें वळण बदललें कीं त्याचा आकारहि बदलला. गांवाच्या शिवारांत जाऊन पोहोंचल्यावर, दुरून रम्य आणि कातीव वाटणाऱ्या त्या डोंगराचें विशाल आणि रुद्र स्वरूप आम्हांला जाणवूं लागलें. एखाद्या मोठ्याथोरल्या मूर्तीच्या पायावर भाविकानें वाहिलेलें फूल पडावें त्याप्रमाणें त्या डोंगराच्या पायथ्याशीं शेलारवाडीचें चिमुकलें गांव दिसत होतें.

चारपांच दिवस गप्पागोष्टींत आणि गांवासभोंवार फिरण्यांत घाल-विल्यावर रणकालीच्या गडावर जाण्याचा प्रश्न गंभीरपणें चर्चेला निघाला. शेलारवाडीच्या आमच्या मित्राला या बाबतींत फारसा उत्साह नव्हता. रण-कालीवर एका छोट्या देवळाशिवाय आणि पडक्या धर्मशाळेशिवाय दुसरें कांहींच पाहण्यासारखें नाहीं, डोंगरावर जाण्याचा रस्ताहि चांगला नाहीं, वरती माणसांची वस्ती अजिबात नाही वगैरे गोष्टी त्यानें सांगितल्या. परंतु या गोष्टींची अडचण आम्हांला वाटेना. रस्ता खराब असला तरी रस्ता होता आणि माणसांचीं पावलें केव्हां ना केव्हां तरी त्यावर उमटलीं होती, अजूनहि उमटत असावींत हें निर्विवाद होतें. वर कांहीं पाहण्यासारखें नसलें तरी डोंगर हीच गोष्ट स्वतंत्रतः आम्हांला पाहण्यासारखी वाटत होती. वस्तीचा मुद्दा तर आमच्या दृष्टीनें अगदींच गौण होता. माणसांची वाजवी-

पेक्षां अधिक वस्ती असलेल्या शहरांतून आम्ही आलों होतों. यजमानाचें मत आम्ही बाजूला सारलें आणि दुसरे दिवशीं गडावर जाण्याचें निश्चित केलें. दुपारीं बैलगाडी घेऊन डोंगराच्या पायथ्याशीं जायचें, उन्हें कलूं लागल्यावर गड चढायचा आणि रात्रीं मुक्कामाला राहून दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं खालीं उतरायचें असा कार्यक्रम आम्ही ठरविला.

" ठीक आहे " आमचा मित्र उद्गारला, " उजाड डोंगरपठार पाहण्याचीच तुमची इच्छा असली तर ती नक्कीच पुरी होईल. कारण आमच्या या रांगेंत इतका उजाड आणि निर्जन डोंगर दुसरा कोणताहि नाहीं ! "

" तूं कधीं गेला आहेस का वरती ? कीं साऱ्या ऐकिवांतील गोष्टी ? "

" लहानपणीं चारपांचदां गेलों आहें. डोंगराची शेवटची चढण सुरू होते तिथें मारुतीचें अेक लहानसें देऊळ आहे. हनुमानजयंतीच्या दिवशी पुष्कळ लोक तिथपर्यंत जातात—"

" आणि वरती देवीपर्यंत जात नाहींत ? देवादेवांतहि या भागांतील लोक पक्षपात करतात असे दिसतें! "

" खेड्यांतल्या लोकांवर, विशेषत: इकडील कोंकणी लोकांवर रूढ समजुतींचा पगडा फार असतो— "

आमचा यजमान मित्र आमच्यापासून कांहीं तरी लपवांत आहे अशी शंका आम्हांला अगोदरच आली होती. तेथील इतर लोकांप्रमाणें रूढ प्रवादांचा पगडा त्याच्याहि मनावर थोडाफार असावा. हीच गोष्ट त्याला आमच्यासमोर प्रगट करावयाची नव्हती. पण आतां त्या गोष्टीची अभावितपणें त्यानें चाहूल दिल्यामुळें सर्वजण त्याच्यावर तुटून पडले.

" काय आहे त्या डोंगरावर—? "

" एका यक्षानें काबीज केलेल्या सरोवराची गोष्ट महाभारतांत आहे. तसा कोणी यक्ष या रणकालीच्या डोंगरावर बसला आहे काय ? "

" डोंगरावर माझ्या माहितीप्रमाणें कोणीहि बसलेला नाहीं. पण—"

" पण काय ? "

" अडाणी लोकांची समजूत आहे कीं एक महंत तेथें संचार करीत असतो ! "

" मग काय बिघडलं ? इतरांनीं तेथें यायला त्याची हरकत आहे का ? "

" तसं नाहीं. हा महंत तुमच्या माझ्या जन्माआधींच मरण पावला आहे ! "

क्षणभर सर्वजण स्तब्ध झाले. कोणीतरी चाचरत विचारलें, " कोण होता तो ? "

" कुणास ठाऊक ! लहानपणीं त्याच्या गोष्टी कानावर येत असत. फार प्रभावी पुरुष असला पाहिजे तो. लोकांमध्यें तो फारसा येत नसे; पण इकडील लोकांची त्याच्यावर भक्तीहि फार मोठी होती ! "

आम्ही एकेकटे असतों तर जावें कीं न जावें या गोष्टीचा कदाचित् प्रत्येकानें विचार केला असता. परंतु सर्वजण एकत्र असल्यानें अशा भाकड गोष्टीवर विश्वास ठेवायला कोणीहि तयार नव्हतें. ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं आमचा कार्यक्रम आम्हीं पार पाडला.

● ● ●

हास्यविनोद करीत डोंगराची वाट चढतांना त्या महंताची आठवणहि आम्हांला राहिली नव्हती. ती आठवण आमच्या बरोबर असलेल्या दोन कोंकणी हमालांनीं आम्हांला करून दिली.

डोंगराची बहुतेक चढण संपलेली होती. वरच्या पठारावर जाण्याचा रस्ता खडकाच्या एका घळईतून गेलेला होता. या घळईच्या तोंडाशींच मारुतीचें छोटेंसें देऊळ आणि सभोंवार उध्वस्त झालेला एक चौथरा होता. विश्रांति घेण्यासाठीं आम्ही या चौथऱ्यावर बसलों होतों. आमच्या कोंकणी जवानांना विश्रांतीची जरूरी नव्हती. घळईतील वाटेनें उड्या मारीत ते पुढें निघून गेले होते.

चौथऱ्यावरून दिसणाऱ्या रम्य देखाव्यानें आमची दृष्टि बांधून ठेवली होती. खालीं खोलवर दिसणारीं शेतें सारीपटावरील चौकोनांप्रमाणें दिसत होतीं. लहान मुलांनीं घरकूल मांडावें त्याप्रमाणें शेलारवाडी आणि जवळचीं इतर खेडीं वाटत होतीं. वरून खूप अरुंद वाटणारा शेलारवाडीजवळच्या नदीचा प्रवाह चांदीच्या लहानशा पत्र्याप्रमाणें लकलकत होता. या साऱ्या देखाव्यावरती मावळतीला चाललेल्या सूर्याचा मंद आणि लालसर प्रकाश भुरभुरत होता.

या रम्य दृश्याचा रसास्वाद आम्ही घेत असतां वरती पुढें गेलेले दोघेहि कोंकणी धापा टाकीत आमच्याकडे परत आले.

" काय झालंय् रे ? परत कां आलांत ? "

त्यांनीं जें सांगितलें त्याचा आशय असा कीं, घळईच्या मध्यभागीं कोणी-तरी भगवीं वस्त्रें परिधान केलेला एक माणूस बसला आहे. त्यांनीं खालूनच त्याला पाहिलें आणि त्याच पावलीं ते माघारीं परत आले ! एकटयानें अथवा दुकटयानें पुढील प्रवास करायला त्यांची तयारी नव्हती. एखादं ' वाघरूं ' किंवा ' तरसं ' आलं असतं तर तें कमरेच्या कोयत्यांनीं त्यांनीं कापून काढलें असतें, पण वैशाखाच्या या दिवसांत घळईच्या मध्यभागीं बसलेल्या संन्याशा-ला ओलांडून एकटयानें पुढें जाण्याचा त्यांना धीर होत नव्हता.

याच गोष्टीनें पुन्हां एकवार त्या महंताची आठवण आम्हां सर्वांना झाली.

पण धास्ती वाटण्यासारख्या मनःस्थितींत आम्हीं नव्हतों. वाट चढून थक-लेला एकादा गोसावी–बैरागी वाटेवर बसला असेल असा आम्हीं तर्क केला. त्या कोंकणी माणसांना बरोबर घेऊन आम्हीं पुन्हां पूर्ववत् मार्गक्रमण करूं लागलों.

आमचा तर्क खरा ठरला. साठसत्तराच्या घरांत असलेला एक म्हातारा संन्याशी घळईंतील वाटेवर विश्रांति घेत बसला होता. दगडाची खूण घालून ठेवलेला एक ग्रंथ त्याच्यासमोर पडलेला होता.

आमच्या शेलारवाडीकर मित्रानें तिकडील रिवाजाप्रमाणें त्या वृद्धाला नमस्कार केला आणि त्याच्यापुढें एक रुपया ठेवला. वृद्धानें रुपया परत करून नमस्काराचा मात्र स्वीकार केला. आम्हीं इतरांनींहि आमच्या मित्राचें अनुकरण केलें. आम्हां सर्वांना आशीर्वाद देऊन तो वृद्ध म्हणाला, " गडावर जात आहांत काय ? "

" होय. "

" जा जा, मोठं रम्य ठिकाण आहे. शिवाय आतां कांहीं धास्तीहि नाहीं संसारी लोकांना ! "

" कसली धास्ती ? "

" खालीं परत न येण्याची ! पन्नास वर्षांपूर्वी वरती गेलेला मनुष्य पुन्हां खालीं येईलच अशी शाश्वती नव्हती ! जा, जा—"

दगडाची खूण बाहेर काढून त्यानें पुस्तक उचललें आणि आमचें अस्तित्व विसरून जाऊन तें वाचावयास सुरुवात केली.

आम्ही पुढें च ू लागलों.

● ● ●

डोंगराच्या माथ्यावर प्रवेश करतांच आम्ही सर्वजण उल्हसित झालों. पायांत चढूं लागलेला शीण क्षणभरांत नाहींसा झाल्यासारखें वाटलें.

या रांगेंतील बहुतेक डोंगरांप्रमाणें रणकालीवरील पठारहि खूप विस्तीर्ण आहे. एखादें लहानसें गांव त्यावरती सहज वसूं शकलें असतें. डोंगरमाथ्यावरती गेल्यावर आपण एखाद्या उंच पर्वतावर आहोंत हें सुद्धां सहजपणें लक्षांत येत नाहीं.

उत्तर दिशेला, म्हणजे आमच्या समोरच्या बाजूला बऱ्याच अंतरावरती काळचा पहाडाचा एक प्रचंड सुळका आकाशांत गेलेला होता. रणकालीचा तो उग्र पर्वत जणूं एक हात उभारून कोणा तरी अज्ञात शक्तीला 'थांब' म्हणून इशाराच देत होता.

पठारावरती लहान लहान झुडपांच्या जाळ्या इतस्ततः दिसत होत्या. मोठालीं झाडेंहि अधूनमधून उभीं होतीं. वारा इतका सोसाटयाचा होता कीं आमचीं शरिरेंहि सावरून धरणें आम्हांला आवश्यक वाटत होतें.

सुमारें दोनतीन फर्लांगांच्या अंतरावर एक जुनाट धर्मशाळा होती. या धर्मशाळेंत जाऊन आम्ही आमचें बिऱ्हाड ठेवलें. धर्मशाळेच्या उजव्या बाजूला पहाडाकडे जाण्याचा रस्ता होता आणि डाव्या बाजूला थोडयाशा अंतरावरती एका पडित घराचे अवशेष होते

त्या अवशेषांकडे बोट दाखवून आमचा मित्र म्हणाला, "हा महंताचा मठ!"

महंताच्या मठांत प्रेक्षणीय कांहींच नव्हतें. धर्मशाळेजवळ असलेल्या एका टांकींतील थंडगार पाणी सेवन करून आम्ही चहाच्या उद्योगाला लागलों.

डोंगरावर संचार करण्याचा कार्यक्रम दुसऱ्या दिवशीं सकाळीं व्हायचा होता. संध्याकाळ टळून गेल्यामुळें फार दूरवर जाणें शक्य अथवा इष्टहि नव्हतें. परंतु ज्या महंतानें आमचें मानसिक स्वास्थ्य अधूनमधून विचलित केलें होतें त्याची राहती जागा एकदां दृष्टीखालून घालण्याचा मोह आम्हांला आवरेना. चहा आटोपल्यावर आम्ही त्या पडक्या भिंतींचे दर्शन घेऊन आलों.

पडक्या ओटयावर कशीबशी उभी असलेली एक पडकी, जळकी भिंत आणि दरिद्री मातेच्या सभोंवार तिचा पोरवडा असावा त्याप्रमाणें त्या भिंतीच्या आश्रयानें इतस्तत: पडलेले दगडमातीचे ढीग–एवढेंच त्या घराचें आजचें स्वरूप होतें.

मठापासून थोडया अंतरावर एक तळें होतें. तळयाच्या मध्यभागीं उरलेलें पाणी हिरव्यागार शेवाळयानें झांकून गेलेलें होतें. तळयावरून पुढें जाणारा रस्ता एका कडयाकडे जात होता. या कडयापर्यंत आम्हीं जाऊन आलों.

कडयावरून दिसणारा देखावा फार भव्य आणि नवख्या दृष्टीला भीतिदायक वाटणारा होता. रणकालीचा डोंगर आणि पलीकडचा रणकालीइतकाच उंच असलेला डोंगर, यांच्यामधील पाताळाप्रमाणें खोल वाटणारी दरी येथून दिसत होती. आम्हीं उभे होतों तो कडा वीसपंचवीस फुटांपर्यंत खालीं तुटलेला होता. तेथें पायरीसारखी, पण बरीच लांबरुंद असलेली एक खोबण होती. तेथून पुन्हां जो कडा तुटलेला होता तो खालीं पांचसातशें फुटांपर्यंत. 'या जागेला महंताची पायरी म्हणतात.' आमचा मित्र उद्‍गारला.

महंत त्या जागेवर बसून तपश्चर्या करीत असे अशी लोकांची समजूत होती. नजर फिरणार नाहीं असा विश्वास असलेल्या माणसाला तेथें जातां येणें सहज शक्य होतें. आमचे कोंकणी जवान तेथें जाऊन, शेंदूर फासलेल्या एका दगडाला नमस्कार करून आलेसुद्धां. पण आम्हांला मात्र, निदान त्या तिन्ही सांजांच्या वेळीं खालीं जाण्याचा धीर झाला नाहीं. आम्ही परत धर्मशाळेंत आलों आणि अन्नसिद्धीच्या उद्योगास लागलों.

रात्रीं दहाच्या सुमारास जेवण वगैरे आटोपून, बाहेरच्या चांदण्यांत आम्ही गप्पा मारीत बसलों होतों डोंगरमाथ्याच्या अपरिचित व अद्‍भुत वातावरणामुळें सर्वजण उत्साहभरित झालेले होते. त्यांतहि पौर्णिमेच्या जवळपास आलेल्या चंद्रानें त्या वातावरणावर आपली रुपेरी किमया पसरून तें अधिकच रम्य केलेलें होतें. काव्यापासून वाघापर्यंत अनेक विषयांचा परामर्ष आम्ही घेत होतों. तेवढयांत कोणीतरी मोठयानें उद्‍गारला, "दिवा!"

"कुठें? कसला दिवा?"

त्यानें महंताच्या त्या मठाकडे बोट दाखविलें. त्या पडक्या भिंतीच्या

आश्रयानें पणतीसारखा किंवा निरंजनासारखा एक बारीक दिवा लुकलुकत असल्याचें आम्हांला दिसून आलें.

हें नवीन प्रकरण काय उपस्थित झालें? आमच्यापैकीं कोणीं दिवा लावलेला नव्हता आणि आमच्याशिवाय दुसरा कोणी माणूस गडावर असल्याचें आम्हांला आढळलें नव्हतें. नाही म्हणायला तो घळईंत बसलेला संन्यासी—

प्रत्यक्ष तेथेंच जाऊन अधिक शोध घेण्याचें आम्हीं ठरविलें.

आमची कल्पना बरोबर ठरली.

मठाच्या ओटयावरती पथारी टाकून तो वृद्ध संन्यासी निवांतपणें चंद्राकडे पहात पडला होता.

"काय, मंडळीना झोंप येत नाहीं का ?" संन्याशानें आमच्याकडे पाहून विचारलें.

"नाहीं, या रम्य वातावरणांत सारखं जागं रहावंसं वाटतं. मुंबईच्या वर्दळीत व धकाधकीत असं सुख पुन्हां मिळायचं नाहीं !"

"आतां या वेळीं इकडे कुठें चाललांत ?"

"इथेंच आलों होतों. दिवा लागलेला पाहिला—"

"मग, भुताटकी वाटली कीं काय कांही ? कोणी तरी केव्हां तरी हा दिवा पाहिला असेल, कदाचित् मलाहि दुरून बघितलं असेल. तेवढ्या आधारावर महंत अद्याप गडावर फिरत असल्याची अफवा लोकांमध्यें पसरली होती. बिचाऱ्या रणकाली देवीला भाविक जनांची भेट मात्र त्यामुळें दुर्मिळ झाली !"

"आपण रोज वरती येऊन दिवा लावतां ?" संन्यासी बोलण्याच्या मनःस्थितींत आहे असें पाहून मीं विचारलें.

"रोज ! मी इकडे असतों कुठें ? वैशाखांतल्या शुद्ध द्वादशीला फक्त मी येथें येतों. महाराजांची पुण्यतिथी आहे ही.'

"महंताची ?"

"होय, महंताची."

"कोण महंत होते हे ? आम्ही कालपासून त्यांचं नांव ऐकतों आहोंत आपला त्यांचा परिचय होता काय ?"

"हो, होता थोडासा."

"फार प्रभावी साधुपुरुष होते ते !"

"प्रभावी म्हणाल तर इतकं प्रभावी व्यक्तित्व असलेलीं माणसं जगांत फार क्वचित् जन्माला येतात. साधुपुरुषहि होते असं म्हणायला हरकत नाहीं."

पलीकडे दिसणाऱ्या रणकालीच्या उंच पहाडाकडे पहात सन्यासी जरा वेळ स्तब्ध होता. महंताच्या प्रभावी व्यक्तित्वाची खूण त्याला त्या पहाडामध्यें दिसत होती का ? महंताच्या चरित्राविषयीं आमची उत्सुकता शिगेला पोहोंचली होती. पण या वृद्धाला बोलके कसें करायचें ?

परंतु त्यानेंच तो प्रश्न सोडविला. पहाडावरून आपली नजर काढीत तो उद्गारला, "या डोंगरावर घडून आलेला तो इतिहास फार विलक्षण आहे. पुण्यतिथीच्या दिवशींच तुम्ही मंडळी योगायोगानें इथें आलां आहांत—"

मी पटकन् म्हणालों, "आम्हांला ती हकीगत ऐकायला मिळाली तर फार आनंद वाटेल—"

"ठीक आहे !" संन्यासी उठून एका मोठ्या थोरल्या दगडाला रेलून बसला.

"तुम्हांला खालीं परत न जाण्याची धास्ती आतां उरलेली नाही असं मघाशीं मी म्हणालों, तो कांही केवळ विनोद नव्हता. तुमच्याचसारखा, किंबहुना तुमच्याहूनहि वयानें थोडासा कमी असलेला एक तरुण एक दिवशी या डोंगरावर आला होता तो कांहीं परत आपल्या घरीं गेला नाहीं, जाऊं शकला नाहीं. त्या तरुणाचं नांव होतं वसुदेव...."

• • •

# २

तिसरी घंटा झाली.

पडद्याच्या दोन्हीं पंखांतून उदाच्या धुराचीं वलयें बाहेर पडत होतीं. अत्तरानें सुगंधित केलेलीं वस्त्रें परिधान केलेली स्त्री जवळ आली म्हणजे त्या

सुवासानेंच तिच्या आगमनाची वार्ता सर्वांना कळावी, त्याप्रमाणें उदाच्या त्या उग्र परंतु मधुर सुगंधानें नाटयदेवता पडद्याआड येऊन उभी असल्याची जाणीव समोरच्या प्रेक्षकांना होऊं लागली.

रंगभूमीच्या पायथ्याशीं बसलेले वाद्यकार आपापलीं वाद्यें जवळ घेऊन जिव्हाळयानें त्यांची विचारपूस करूं लागले होते

विजयानंद नाटयगृहांतील सर्व वातावरण उत्साहानें आणि अपेक्षेनें भारावून गेलें होतें.

किर्लोस्कर मंडळींची कृपादृष्टि कित्येक वर्षांनीं नाशिककडे वळली होती. नाटयक्षेत्रांत अग्रभागीं असलेली ही संस्था एखाद्या शहरीं आली म्हणजे तेथील रसिकांना मोठी पर्वणी आल्यासारखें वाटायचें. जोगळेकर, बोडस, बालगंधर्व यांजसारख्या नामांकित नटांचा आणि सौभद्र, शारदा, मृच्छकटिक, यांसारख्या सुरस नाटकांचा संग्रह या संस्थेजवळ होता. त्यांतहि बालगंधर्वांविषयीं लोकांना विशेष आकर्षण वाटत होतें तारुण्याच्या उंबऱ्यावर असलेला हा नवा नट आपल्या संगीतानें आणि सौंदर्यानें रंगभूमीवरती यक्षलोकाचें स्वप्नमय वातावरण निर्माण करूं लागला होता.

नाशिक शहरांतील सगळे अंधेरे, आकुंचित आणि चिरेबंद रस्ते त्या रात्रीं विजयानंदाकडे जात होते.

आजच्या सौभद्राच्या प्रयोगाला खुद्द कलेक्टर हजर राहणार आहे ही बातमीसुद्धां कमी महत्त्वाची नव्हती. ज्यांना नाटयाविषयीं फारशी आस्था नव्हती असे कित्येक लोक, विशेषतः मोठमोठ्या हुद्यावर असलेले सरकारी नोकर व प्रतिष्ठित नागरिक कलेक्टर येणार म्हणून नाटकाला आले होते. त्यांच्या झोंकदार किरमिजी, अंजिरी पगड्यांनीं आणि रेशिमकांठी उपरण्यांनीं पहिल्या दोनतीन रांगांना मोठा दिमाख आणला होता. शिवाय टेवणींतले शालू आणि अलंकार अधेंमधें लखलखत होते ते वेगळेच.

तिसरी घंटा झाली तरी पडदा वर जाईना. लोकांची उत्सुकता अधिक वाढविण्यासाठीं ही क्लृप्ति नव्हती. कलेक्टरसाहेबांना यायला अद्याप थोडा अवकाश होता. त्यांच्यासाठीं पडदा थोपवून धरण्यांत आला होता.

सभोंवारच्या उत्साहाचा आणि आनंदाचा स्पर्श वसुदेवाच्या अंतःकरणा-

ला होणें अगदीं अशक्य होतें. चारी बाजूंनीं पाण्यांत कोंडलेल्या एखाद्या लहान बेटासारखी त्याची अवस्था होती. भोंवतालच्या जगांत असूनहि नसल्यासारखा होता तो.

त्याची अस्वस्थ नजर समोरच्या गर्दींतून पुन्हांपुन्हां नाटयगृहाच्या पहिल्या प्रवेशद्वाराकडे जात होती.

कलेक्टर आलेच नाहींत तर ?

क्षणभर त्याला वाटायचें, खरोखर, ते आले नाहींत तरच बरं होईल. कांहीं तरी अपघात व्हावा, जरुरीचं काम निघावं आणि कलेक्टरचं आगमन रद्द व्हावं...

कलेक्टर आला तर या रंगमय, आनंदमय वातावरणांत एकदम केवढा उत्पात होईल ! जीवनाचा बेहोषपणानें रसास्वाद घेणारे शेंकडों लोक एकदम मरणाच्या किनाऱ्यावरून पिसाटासारखे धावूंपळूं लागतील.

कलेक्टरसंबंधींचें त्याचें मत वाईट नव्हतें. किंबहुना नाशिकच्या साऱ्याच नागरिकांमध्यें सध्यांच्या कलेक्टरसंबंधीं कांहींशी आपुलकीची भावना होती.

इतर गोऱ्या अधिकाऱ्यांप्रमाणें जनतेपासून उंच अशा आसनावर बसून, खालीं तिरस्कारानें पहात तो जिल्ह्याचा कारभार करीत नव्हता. त्याच्या स्वभावांत मग्रुरी नव्हती, दर्प नव्हता. उलट, हिंदी जीवनाचा आणि संस्कृतीचा जवळ जाऊन परिचय करून घेण्याचा त्याला छंद होता.

—पण व्यक्ति चांगली असली म्हणून काय झालें ? वसुदेवाच्या अंतःकरणांत रुजलेला पारतंत्र्याचा आणि देशावर तें लादणाऱ्यांचा द्वेष पुन्हां क्षणार्धात जाळासारखा वरतीं उफाळून येई

पिंजरा सोन्याच्या तारांचा असला तरी तो पिंजराच आणि तुरुंग संगमरवरी दगडांचा बांधला असला तरी तो तुरुंगच ! सोन्याचा आणि संगमरवराचा बाजारभाव् लक्षांत घेतला तर दास्याचे हे पाश केव्हांहि तोडतांच यायचे नाहींत !

पण या मार्गानें दास्याचे पाश खरोखरी तोडतां येतील का ?

लोकमान्य टिळकांची धीरगंभीर मूर्ति त्याच्या मनासमोर उभी राहिली मेघनादाप्रमाणें त्यांचे कठोर, असंदिग्ध शब्द त्याच्या कानांत घुमूं लागले. अडीच तीन वर्षांपूर्वी टिळक नाशिकला आले होते. स्वातंत्र्यासाठीं प्राणार्पण

करण्यास सिद्ध असलेल्या तेथील कांहीं तरुणांसमोर त्यांनीं मुद्दाम भाषण केलें होतें.

या मार्गानें जाऊन देशाचें आणि स्वतःचें अहित करूं नका असें त्यांनीं बजावून सांगितलें होतें. स्वातंत्र्याच्या तीव्र आकांक्षेनें प्रज्ज्वलित झालेलीं आणि त्यासाठीं त्याग करूं शकणारीं तरुण माणसें देशांत फार थोडीं आहेत. त्यांनीं ज्योतीवर झडप घालणाऱ्या पतगाप्रमाणें स्वतःचा नाश करून घेऊं नये...

टिळकांच्या त्या शब्दांचा इतर कित्येकांप्रमाणें त्याच्याहि मनावरती फार परिणाम झालेला होता. राजकारणाचा सर्वच तपशील त्याच्या बुद्धीला त्या वेळीं कळत नव्हता. त्याला कळत होतें तें एवढेंच कीं टिळक सांगतात तें खरें असले पाहिजे.

पुढील काळांतहि विरोधी श्रद्धांच्या आणि विचारांच्या वादळांत त्याचें मन सतत हेलकावे घेत राहिलें होतें. त्यामुळें त्या तरुण मित्र मंडळांतील त्याचें स्थान नेहमीं सरहद्दीवरचें होतें. म्हटलं तर तो त्यांत होता, म्हटलं तर नव्हताहि. त्यांच्या अंतस्थ बैठकींत आणि योजनांमध्यें प्रवेश नसल्या-मुळें, बंदर सुटलेल्या नावेसारखी त्याची अवस्था कांहींशी अगतिक झाली होती. दास्यद्वेषाचा अंतःकरणातील अग्नि जागृत ठेवणें इतकेंच कार्य त्याला राहिलें होतें.

केव्हां केव्हां त्याला वाटायचें, ही खरोखर आपली दुर्बलता आहे. इतरां-प्रमाणें पुढें पाऊल टाकण्याची आपल्याला धमक नाहीं.

शहरात कांहींतरी होणार आहे याची वार्ता त्याला अगोदरच समजली होती. आघाडीवर असलेल्या मंडळींत त्यासंबंधीं झालेल्या वादविवादाचे पडसादहि त्याच्या कानावर आले होते

आज सकाळीं रघू कुलकर्णी त्याच्या घरीं आला होता. वसुदेवाच्या हातीं त्यानें नाटकाचें एक तिकीट दिलें आणि थिएटरमध्यें जरूर ये म्हणून सांगि-तलें. जिन्यामध्यें आल्यावर थिएटरमध्यें काय होणार आहे हेंहि त्यानें हलक्या आवाजांत सांगितलें.

" मला कांहीं कार्य आहे का ? "

" कार्य कांहीं नाहीं. ज्यांचा विशेष संबंध आहे अशा लोकांनीं तिथें येणं इष्ट नाहीं. जें घडेल त्याची प्रत्यक्ष हकीगत पाहिजे आहे आम्हांला. "

पण वार्ताहराची तटस्थता त्याच्या ठिकाणीं राहिलेली नव्हती. पुढें होणाऱ्या गोष्टींचीं अनेक कल्पनाचित्रें त्याला अत्यंत अस्वस्थ करीत होतीं. या चार भिंतींमध्यें केवढा कल्लोळ उसळेल, बाहेर पडण्यासाठीं लोकांची किती धडपड तडफड होईल, कोणाकोणाचो जागच्या जागीं धरपकड होईल, त्यांत आपणहि—

त्याच्या या मानसिक यातना संपण्याचा क्षण नजीक येऊन ठेपला.

पहिल्या दरवाज्यापाशीं स्वागताची थोडीशी गडबड झाली आणि कलेक्टर-साहेब पायऱ्या उतरून आपल्या खुर्चीकडे जाऊं लागले.

गळ्यांत पडलेल्या हारांचा सस्मित मुद्रेनें स्वीकार करून ते खुर्चीवर बसले.

तबल्यावर तब्बलजीची थाप पडली. सारंगीवरून धनुकली फिरूं लागली. ऑर्गनमधून नांदीच्या गाण्याची रागदारी निनादूं लागली. त्या संमिश्र मधुर स्वरांचा मेळावा, फुलपांखरांच्या थव्याप्रमाणें रंगभूमीसमोर नाचूं बागडूं लागला.

तेवढ्यांत पिस्तुलाचा कठोर, कर्णभेदक आवाज झाला आणि सर्व नाट्य-गृह एका भयानक गोंधळांत, कल्लोळांत बुडून गेलें !

वसुदेवाचें भान हरपलें. आपण कशासाठीं आलों आहोंत याची शुद्ध त्याला उरली नाहीं. दाराच्या दिशेनें उसळलेल्या एका लोंढ्यांत तो घुसला आणि सर्व शक्ति एकवटून त्यानें बाहेर जाण्यासाठीं वाट काढली.

थिएटरच्या बाहेर, रस्त्यावर येऊन पोहोंचल्यावरती आपला जीव परत शरिरांत येत आहे असें त्याला वाटलें. त्यानें मागें वळून पाहिलें. थिएटर-मधले लोक बाहेर पळत होते आणि बाहेरचे लोक थिएटरकडे पळत होते. बाहेरच्या दारापाशीं एकच धुमश्चक्री उडाली होती.

आतां पुढे कुठें जायचें ? घरीं जाणें श्रेयस्कर नव्हतें. थिएटरमधील प्रकाराची वार्ता कळल्यावर काका आपल्याला दार उघडतील कीं नाहीं याचीहि त्याला शंका वाटत होती. माणसानें सरकारदरबारीं राहून मानमरातब मिळवावा, पैसे कमवावे, हें त्यांचें तत्त्वज्ञान होतें. पुतण्याचे उद्योग त्यांना पसंत नव्हते आणि त्याच्या नांवावर पोस्टांत असलेल्या रकमेचा फायदा त्यांना मिळत नसता तर यापूर्वींच त्याला त्यांनीं बाहेरची वाट दाखविली असती.

त्याचे पाय आपोआप नदीकडे वळले. या साऱ्या गर्दीपासून कुठें तरी लांब,

एकांत ठिकाणीं, मोकळ्या हवेंत जाऊन बसण्याची त्याला आवश्यकता होती. नदीकांठचे घाट ओलांडून तो पुलाखालीं असलेल्या निर्जन खडकावर जाऊन बसला.



मध्यरात्र व्हायला आली, पण त्याच्या मनावरील ओझें कमी होईना. नुकत्याच उगवलेल्या चंद्राचें क्षीण चांदणें सभोंवारच्या अंधारावर ओघळूं लागलें होतें. पुलाच्या उच्च कमानी आणि पलीकडून वाहणाऱ्या नदीप्रवाहाचें त्या अंधारउजेडात दिसणारें स्वरूप कांहीसें भेसूरच होतें. विविध आकार धारण करणाऱ्या मोठमोठ्या काळ्या सांवल्या जागोजाग दडून बसल्या आहेत असा भास त्याला झाला. त्या एकांताची, तेथील निःशब्दतेची त्याला भीति वाटूं लागली.

कांहीं तरी केलें पाहिजे, कुठें तरी गेलें पाहिजे, कुणाशीं तरी बोललें पाहिजे..असें त्याला तीव्रतेनें वाटूं लागलें. त्याच्या मनाला एखाद्या मोठ्या थोरल्या गिरणीचें स्वरूप आलें होतें. चक्रावर चक्रें घणघणत होतीं, दांत्यांवर दांते घासत होते, लोखंडाचे विशाल स्तंभ खालींवर आदळत होते आणि या सर्व कल्लोळांतून त्याला नको असलेल्या भयप्रद, अप्रिय विचारकल्पनांच्या राशी त्याच्यासमोर येऊन कोसळत होत्या.

त्या अंधुक चांदण्यात एक आशा मार्गक्रमण करीत असलेली त्याला दिसली.

शहरांतून आलेली कोणी स्त्री पलीकडील दरडीच्या रस्त्याकडे चालली होती. तिचा मार्ग त्याच्या जवळूनच होता. दरडीपासून काही अंतरावर, फावल्यावेळी शरीरविक्रयाचा व्यवसाय करणाऱ्या स्त्रियांची वस्ती आहे हें त्याला आठवलें. ही स्त्री तिकडेच जाणारी असेल का ?

जवळ येतांच त्या स्त्रीचीं पावलें किंचित् मंद पडूं लागलीं. डोक्यावरचा पदर तिनें सांवरला आणि वाऱ्यामुळें अंग शहारून आल्याचा आविर्भाव करीत ती हलक्या आवाजांत पुटपुटली, "यायचंय् का ?"

वसुदेव तिच्याबरोबर तिच्या झोंपडीकडे गेला. स्वतःच्या मनापासून, जें झालें त्याच्या व जें होणार होतें त्याच्या विचारांपासून त्याला मुक्तता हवी होती. या मुक्ततेसाठीं कोणतीहि किंमत द्यायला तो त्या क्षणीं तयार होता.

शरीरवासना केवढें प्रबळ रूप धारण करूं शकते, तिच्या धडधडत्या

प्रवाहांत मनाचीं सर्व बरींवाईट चेष्टितें कशीं गवताच्या पात्यांप्रमाणें वाहून जातात याचा प्रत्यय त्या रात्रीं त्याला आला.

● ● ●

पहाटेच्या वेळीं सुदैवानें त्याला झोंप लागून गेली. अकस्मात् कांहीं आघात होऊन माणूस बेशुद्ध व्हावा त्याप्रमाणें निद्रेनें न कळत त्याला आपल्या आधीन करून घेतले.

त्याला जाग आली तेव्हां नऊचा सुमार झालेला होता. त्या लहानशा खोपटयामध्यें तो एकटाच पडलेला होता. छपराच्या छिद्रांमधून सूर्याचे दोन-चार कवडसे आंत आले होते. त्यांत तरंगणारे धूलिकणांचे समुदाय लगबगीनें परस्परांच्या भोंवतीं फिरत होते.

त्या प्रकाशावर क्षणभर स्थिर झालेली त्याची नजर सभोंवारच्या परिस्थितीकडे वळली. एका जुनाट कळकट परंतु जाड गादीवरती तो पडलेला होता. बिछान्यापासून एक हाताच्या अंतरावर स्वयंपाकपाण्याचें दरिद्री साहित्य होतें. झोंपडीच्या कानाकोपऱ्यांत जुनीं लुगडीं, कांहीं टिनचे डबे, पत्र्याच्या एकदोन भडक रंगाच्या ट्रंका, लाकूडथलप्यांच्या मोळ्या वगैरे गोष्टी इतस्तत: पडलेल्या होत्या. घर या संस्थेचें इतकें संकुचित, अव्यवस्थित आणि त्रोटक स्वरूप वसुदेवाच्या दृष्टीला आज प्रथमच दिसत होतें. त्याला वाटलें, ज्या जगांत आपलें पाऊलहि कधीं पडलें नसतें तेथें आपण या बिछान्यावर अर्धी रात्र काढली हा काय विचित्र योगायोग आहे ?

शरिराप्रमाणें मनहि जागें झाल्यावरती त्या साऱ्या गोष्टींची आत्यंतिक शिसारी त्याला वाटूं लागली. ज्या बाईच्या बाहुपाशांत त्यानें ती रात्र काढली होती तिचें पुरेसें स्पष्ट दर्शनहि त्याला झालें नव्हतें. तें दर्शन आतां, दिवसाच्या या प्रकाशांत होतां कामा नये असें त्याला तीव्रतेनें वाटूं लागलें. कोपऱ्यातील मातीची चूल पेटलेली होती आणि त्यावरती बहुधा वसुदेवासाठींच चहाचें आधण ठेवण्यांत आलेलें होतें. लौकर परत येण्याचा तिचा इरादा असला पाहिजे हें त्यानें ओळखलें. तो धडपडत उठला. आणि कपडे पेहरून घाईगर्दीनें झोंपडीच्या बाहेर पडला. समोरील खोपटयाच्या दाराशीं एक स्त्री रस्त्यावर दांत घाशीत बसली होती. काजळानें चौफेर बरबटलेले आपले डोळे विस्फारून तिनें वसुदेवाकडे कांहींशा चेष्टेनें आणि विस्मयानें

पाहिलें. ते डोळे जणूं विचारीत होते, "या पुढें तरी कांहीं शहाणपणानें पारख कराल काय ?"

वसुदेवानें लज्जित होऊन मान खालीं घातली आणि आजूबाजूला न पाहतां त्या खोपट्यांच्या वसाहतींतून तो झपाट्यानें बाहेर पडला.

● ● ●

सर्व नाशिक शहर अभूतपूर्व प्रक्षोभांत सांपडलें होतें. इतका हाहाःकार शहरांतील लोकांनी कधींहि अनुभवला नव्हता. तुफानी वादळामध्यें एखाद्या वृक्षाच्या पानाफांद्यांचा सारा संसार आहे–नाहींच्या सरहद्दीवर हेलकावत रहावा त्याप्रमाणें नागरिकांची, विशेषतः पांढपेशा नागरिकांची जीवनचर्या आमूलाग्र हादरून गेली होती. मध्यमवर्गीय समाजाच्या अवघ्या जीवनावरती पोलिसखात्याच्या बुटाची प्रचंड काळी छाया पडली होती. यमदूताप्रमाणें भासणारीं खाकी वेषांतील माणसं कोणत्या घरांत शिरतील आणि कोणाला बाहेर ओढून नेतील याचा नेम राहिला नव्हता. कोठलीहि शाश्वती नव्हती, कसलीहि सुरक्षितता नव्हती. पुढारलेल्या समाजाचें जीवन पोलिसांनीं अक्षरशः नांगरून काढावयास सुरुवात केली होती.

शहरावर पसरलेली कळा पाहून, काय होत आहे याची वसुदेवाला कल्पना आली. पोलिसांच्या पहिल्या यादींत आपलें नांव असणार याबद्दलहि त्याला शंका नव्हती. नाशिकमध्यें फार वेळ राहणें इष्ट नव्हतें. राहण्याचें फारसें कारणहि नव्हतें. शक्य तेवढ्या लवकर गांवाच्या सीमा ओलांडून कोठें तरी, अधिक सुरक्षित अशा ठिकाणीं जाणें जरूर होतें. स्वतःचें म्हणतां येईल असें घर त्याला नव्हतेंच. परंतु आईवडिलांच्या मागें ज्या घरांत त्यानें अनेक वर्षें काढलीं होतीं तेथें एकदां जावें आणि वडील माणसांकडून इतर कांहीं नाहीं तरी त्यांचे आशीर्वाद घ्यावेत असा मोह त्याला झाला.

मोठमोठे रहदारीचे रस्ते टाळून तो आपल्या घराच्या दाराशीं येऊन दाखल झाला. दरवाजा बंद होता. माडीच्या खिडक्याहि बंद होत्या. ओट्यावर घरांतील व आसपासच्या मुलांची दंगल चालायची, तिचाहि कांहीं मागमूस लागत नव्हता. सर्वत्र सामसूम होती. गल्लींतील इतर घरांची अवस्थाहि याहून वेगळी नव्हती. घराचा आकार असलेले मोठमोठे निर्जीव ठोकळे दोन रांगांमध्यें ठेवून दिलेले आहेत कीं काय, असा भास होण्याइतकी शांतता

सभोंवार पसरली होती. अधूनमधून एखाद्या दाराची करकर होई आणि फटींतून कोणी आंत जाई किंवा बाहेर येई. पण वसुदेवाकडे नजर उचलून पहावयास कोणीहि तयार नव्हतें. खिडक्यांच्या छिद्रांतून व फटींतून मात्र एखादा डोळा क्षणभर लुकलुके आणि दुसऱ्याक्षणीं अदृश्य होई.

काय करावें आणि काय करूं नये याचा बोध वसुदेवाला होईना. त्याची बुद्धि बधिर झाली होती. दारावर मान टेकून तो सुन्न होऊन उभा राहिला.

तेवढ्यांत त्या निःशब्दतेचा भंग झाला. एका कर्कश आणि कर्णभेदक हंबरड्यानें ती शांतता शतशः विदीर्ण झाली. वसुदेवानें चमकून त्या हंबरड्याच्या दिशेकडे दृष्टि टाकली. जें दृश्य त्याला दिसलें तें पाहून त्याच्या सर्वांगावर शहारे आले. पलीकडच्या बोळामधून बाहेर पडलेली एक तरुण मुलगी बेहोष होऊन नदीच्या दिशेनें धांवत होती. अंगावरचा पदर तिनें कमरेला घट्ट खोंचून ठेवलेला होता आणि कपाळावरती कुंकवाचा मळवट भरला होता. धांवण्यामुळें कपाळावरचें कुंकू तिच्या गोऱ्यापान चेहऱ्यावर ओघळून आलें होतें. तिच्या पाठोपाठ कांहीं अंतरावर आठदहा पुरुषांचा एक थवा धांवत आलेला वसुदेवाला दिसला. ती मुलगी उंच स्वरानें ओरडत होती, "नाहीं, मला जाऊं द्या–मला जाऊं द्या!"

वसुदेव उभा होता त्या जागेपासून थोड्या अंतरावर, मागें धांवत असलेल्या जमावानें त्या मुलीला धरलें. बारकाईनें पाहिल्यावर वसुदेवाला त्या मुलीची ओळख पटली. कटाशीं निकटचा संबंध असलेल्या एका तरुणाची ती नवपरिणित पत्नी होती. आपल्याला धरून ठेवणाऱ्या लोकांच्या हातांतून निसटण्यासाठीं निकराची धडपड करीत ती कांहीं तरी ओरडत होती व ते लोक तिची समजूत घालीत होते. शेवटीं जवळजवळ ओढत फरफटत ते त्या मुलीला आपल्याबरोबर परत घेऊन गेले

एवढा प्रकार झाला तरी जवळपासच्या घरांतून कोणीहि बाहेर आलें नाहीं. माडीवरच्या खिडक्यांच्या फटी थोड्या अधिक रुंद झाल्या इतकेंच.

मुलीला घेऊन जाणाऱ्या जमावांत एक हमाली पेशाचा माणूस होता. मुलीचा बंदोबस्त होऊन सर्व मंडळी पलीकडच्या गल्लींत दिसेनाशी झाल्यावर तो वसुदेवाकडे आला. डोक्यावर तांबड्या रंगाचें भलें मोठें पागोटें, अंगांत मांजरपाटाचा मळकट सदरा, जेमतेम गुडघ्यापर्यंत जाणारें आणि

कसून आवळलेलें धोतर, खांद्यावर पोतीं वाहण्यासाठीं उपयोगी पडणारें घन्हाट आणि हातापायावर व तोंडावर नवीन फुटूं लागलेल्या कोडांचे डाग—अशा स्वरूपाची ही व्यक्ति ओळखदेख नसतां आपल्याकडे नजर लावून पुढें येत असलेली पाहून वसुदेवाला आश्चर्य वाटलें.

ती व्यक्ति अगदीं जवळ आली आणि हलक्या आवाजांत म्हणाली, " गृहस्था, अजून ओळखलं नाहींस का ? "

" नाहीं, कोण–" आणि तेवढ्यांत त्याला शंका आली. तो चकित होऊन उद्गारला,

" कोण, रघू—? "

" होय, रघूच मी. ती मुलगी कोण तें ओळखलंस का ? "

" हो. ती आपल्या— "

" ठीक आहे ! पण तूं आतां काय करणार आहेस ? "

" मी—मी काकांना भेटायला आलों होतों घरीं ! "

" कांहीं कुणालाहि भेटूं नकोस ! क्षणभरहि तुला घरांत थारा मिळणार नाहीं. पोलिसांनीं सुरू केलेली धरपकड आमच्या अपेक्षेपेक्षां फार जास्त आहे. प्रत्येक घरांतून कोणी तरी उचलायचा त्यांचा विचार दिसतो. तूं घरीं तर जाऊं नकोसच, पण पुन्हां घराजवळहि येऊं नकोस. तू फांसावर जाणार नाहींस, पण काळ्या पाण्यावर नक्की जाशील. तें चुकवायचें असेल तर ताबडतोब नाशिक सोडून बाहेरगांवीं जा. कोठल्याहि नातेवाईकाकडे किंवा मित्राकडे मात्र जाऊं नकोस. नांव खटल्यांत गोवलं गेलं नाहीं तर पुढेंमागें परत येतां येईल. जा. शक्य तों प्रत्येकानं जिवंत राहिलं पाहिजे. स्वातंत्र्याच्या पुढच्या लढ्यासाठीं जिवंत राहिलं पाहिजे.... "

" आणि तूं काय करणार आहेस ? "

" मीहि जिवंत आणि तुरुंगाबाहेर राहण्याचा यत्न करणार आहें; पण सांगतां येत नाहीं. मला नाशिकांत कांहीं कामें आहेत, कांही जबाबदारी आहे. ती पार पाडल्याशिवाय बाहेर जाणें शक्य नाही. ठीक आहे. फार वेळ इथं राहणं बरोबर नाहीं. हे राहूं दे, प्रवासांत लागतील—"

सदऱ्याच्या खिशांतून त्यानें एक चंची बाहेर काढली आणि तिच्यांतून पन्नासाच्या नोटा काढून त्या वसुदेवाच्या हातांत दिल्या.

" हें कशाला... ? "

" वेश्येकडे जाण्यासाठीं ! " रघू मूळ स्वभावावर जाऊन हंसत उत्तरला. "तुरुंगांतच जायचा विचार असेल तर अगोदर शक्य तेवढी चैन करून जा ! मेंढराप्रमाणें जीवन जगणाऱ्यांसाठीं नीति वगैरे गोष्टी. उघडी छाती करून स्वातंत्र्यासाठीं मृत्यूसमोर ठाण मांडणाऱ्यांना कसलींहि बंधनें नाहींत. अच्छा, जातों आतां, अद्याप अनेकांना भेटायचं आहे. आणि शहाणा असशील तर काकाच्या अन् काकूंच्या नादीं लागूं नकोस. या क्षणीं शहर सोडून जा. रेल्वेनें जाऊं नकोस, बैलगाडीनें जा, नाहींतर पायीं जा. वंदे मातरम् ! "

रघू कुलकर्णी म्हणजे काय चीज आहे हें वसुदेवाला माहीत होतें. तो कशासाठीं नाशिकमध्यें राहत आहे याचीहि त्याला कल्पना आली. स्वतःचें सरण पेटवून त्यावरती उभा राहिला होता तो. इतरांचें रक्षण करण्यासाठीं स्वतःचे प्राण हंसत खेळत अर्पण करायचा त्यानें निर्धार केला होता. त्याच्या डोळ्यांत आसवें उभीं राहिलीं. तो रघूचा हात हातांत घेत उद्गारला, " आतां पुन्हां केव्हां भेटशील ? "

" पुन्हां भेट ! " रघू स्मित करून म्हणाला, " ईश्वराची इच्छा असली तर पृथ्वीवर, नाहींतर स्वर्गांत— "

वसुदेवाचा खांदा स्नेहभरानें एकदां गदगदा हालवून, रघू कुलकर्णी डोक्यावरचें पागोटें सांवरीत झपाट्यानें निघून गेला.

● ● ●

रघूच्या सांगण्यानुसार वसुदेवानें ताबडतोब नाशिक सोडण्याचें ठरविलें. दारें खिडक्या बंद असलेल्या आपल्या अचेतन, निष्प्रेम घराकडे त्यानें एकवार नजर टाकली आणि पुन्हां मागें वळून न पाहतां तो रस्ता चालूं लागला. त्याच्या मनांत विचार आला, घर ही गोष्ट दगडविटांनीं बांधली जात नाहीं; जिव्हाळ्याच्या व प्रेमाच्या धाग्यांनीं जे बांधलें जातें तेंच खरोखर घर या संज्ञेला पात्र होऊं शकतें. तो दाराशीं येऊन उभा राहिला होता हें घरांतील मंडळींना कळलें नव्हतें असें नाहीं. वरच्या खिडक्यांची फडफड त्यानें पाहिली होती, दाराच्या जवळपास झालेली चर्चाहि अस्पष्टपणें त्याच्या कानावर आली होती. त्याला घरांत घेणें धोक्याचें होतें हें खरेंच, पण पांच मिनिटें, केवळ निरोप देण्यासाठींसुद्धां हा धोका पत्करण्याचा धीर ज्या मनो-

वृत्तीस नव्हता तिच्याबद्दल त्याला विषाद वाटूं लागला. दोन रुपयांच्या मोबदल्यांत आणि चार तासांच्या सहवासांत आपल्यासाठीं स्वयंस्फूर्तीनें चुलीवर चहाचें आधण ठेवणारी ती अशिक्षित परकी स्त्री आणि आपल्या नांवावर असलेल्या आठ दहा हजारांच्या रकमेवर बसून, दरवाजा बंद करणारीं हीं आपलीं माणसें—खरोखर या जगांत आपलें म्हणून कांहीं असतें काय ? स्वतःच्या साडेतीन हात लांब शरीराशिवाय अशी दुसरी कोणती चराचर वस्तु आहे कीं जीवर माणूस निर्वेधपणानें आपला हक्क सागूं शकेल !

पंचवटीजवळ असलेल्या गाडीतळावर तो येऊन ठेपला. खेड्यापाड्यांतली बहुतेक वाहतूक त्या वेळीं बैलगाड्यांतून होत असे. जिल्ह्यांतील जवळ-दूरच्या खेड्यांतील गाड्या माल व उतारू घेऊन शहरांत येत आणि माल व उतारू घेऊन पुन्हां आपल्या गांवीं परत जात. वसुदेव गाडीतळावर आला तेव्हां एक गाडी बैल जुंपून निघण्याच्या तयारींत होती. वसुदेवाला अमूकच ठिकाणीं जावयाचें होतें असें नाहीं, त्याला फक्त ताबडतोब जावयाचें होतें. बाजारपेठेंतून येतांना कांहीं जरुरीच्या वस्तू व वस्त्रप्रावरणें त्यानें खरेदी केलीं होतीं. त्यांचें गाठोडें त्यानें गाडींत टाकलें व गाडीवानाला विचारलें,
" कुठें जाणार गाडी ? "

" शेलारवाडीला. कुठं जायचंय् ? "

" शेलारवाडीलाच ! "

शेलारवाडी कुठें आहे हें वसुदेवास ठाऊक नव्हतें. किंबहुना या गांवाचें नांवहि आज तो प्रथमच ऐकत होता. परंतु आतां विचार करायला अथवा पुढील योजना करायला अवसर नव्हता. तो गाडींत चढून बसला. गाडी-वानानें बैलाच्या पाठीवर चाबूक फटकारला आणि गाडी चालू लागली. बैलांच्या गळ्यांतील घंटांची रुणझुण आणि खडकावरून जाणाऱ्या लोखंडी धावांची खरखर ऐकून वसुदेवाला समाधान वाटलें. गेले पंधरावीस तास सतत तडफडणाऱ्या त्याच्या अंतःकरणाला प्रथमतःच समाधानाचा व शांत-तेचा शीतल स्पर्श झाला.

● ● ●

दुसऱ्या दिवशीं सकाळीं गाडी शेलारवाडीला जाऊन पोहोंचली. गाडीं-तल्या प्रवासांतच महंतांचें नांव प्रथमतः त्याच्या कानावर आलें. शेलारवाडी-

जवळ एक डोंगर आहे आणि या डोंगरावर कोणी संन्यासी एका मुलीसह वास्तव्य करीत आहे ही गोष्ट उतारूंच्या संभाषणांतून त्याला समजली. त्या संन्याशावर या मंडळीची गाढ श्रद्धा असल्याचेंहि त्याला आढळून आलें.

उतारूंपैकीं एका शेतकऱ्याची बायको विषमासारख्या तापानें खूप आजारी होती.

"मीं प्रथम ठरवलं" तो आपल्या कोंकणी भाषेंत इतरांना सांगत होता, "कीं गडावरती तिला तशीच उचलून न्यावी आणि महंतबाबाच्या पायावर घालावी. म्हणावं, बाबा, तूं तार नाहींतर मार. तुझ्याशिवाय कोणी आम्हांला त्राता नाहीं!"

"बरोबर!" दुसरा एकजण उद्गारला, "त्याचींच लेकरं आपण. मायबाप सर्वांचा तो. देवाची इच्छा त्यालाच कळते."

"पण म्हटलं, आधीं बाबाला विचारावं-" पहिला उतारू पुढें सांगूं लागला, "पावला तर मेणासारखा मऊ, नाहीं तर नुसत्या डोळ्यांतल्या आगीनं जाळून टाकील! म्हणून गडावर जाऊन विचारलं. बाबा म्हणाला, गाढवा, इतकी तापानं होरपळली आहे तर गडावर आणतां आणतांच मरून जाईल ना ती पोर! बाबा तसाच उठला, माईला बोलावून कांहीं सामान-सुमान घेतलं अन् तसाच माझ्याबरोबर खालीं आला. तेव्हांपासून रोज माझ्या खोपट्यावर येतो. आणि आपल्या हातानं तिचं औषधपाणी करतो. स्वतःच्या हातानं सारं कळकट मळकट त्यानं साफ केलं. आमच्यावर फार माया त्याची. त्याचा हात लागतांच बायकोची तब्येत सुधारायला लागली आहे. पण बाबा तापट फार! परवांच बायको म्हणाली कीं, लसणीचं कालवण फार खावंसं वाटतं. म्हटलं इतक्या दिवसांची उपाशीतापाशी. द्यावं थोडंसं. बाबानं सांगितलं होतं, कांहीं खायला द्यायचं नाहीं म्हणून. पण तिची इच्छा फार अन् मलाहि वाटलं, इतके दिवस अन्नावांचून काढले आतां एका दिवसाच्या खाण्यानंच कसं पुण्य निघून जाईल? बाईच्या पुढें ताट ठेवलें आणि तेवढ्यांत बाबा डोंगरासारखा दारामध्यें उभा राहिला. डोळ्यांतून ठिणग्या पडायला लागल्या त्याच्या. त्यानं ताट उचललं आणि दाराबाहेर भिरकावून दिलं."

"बरोबर आहे!" कोणीतरी म्हणालें, "तिनें इतके दिवस उपास केला

पाहिजे अशी देवाची इच्छा असेल. ती बाबाला कळणार, तुम्हां आम्हांला काय कळणार ती ! "

" आम्ही दोघंहि बाबाच्या पायावर पडलों आणि सांगितलं, बाबा, आतां पुन्हां असं घडायचं नाहीं. तूं सांगशील तसं वागूं. बाबाचा राग गेला आणि त्यानं पुन्हा मंत्रतंत्र व औषधपाणी करायला सुरुवात केली. आतां बायको पायावर उभी राहून घरांतल्या घरांत हिंडायला लागली आहे. बाबाची कृपा ! "

" खरंच ! बाबाची कृपा ! " अनेकजणांनीं त्याला सांथ दिली.

महंत, संन्यासी, बैरागी वगैरेंच्या जमातीविषयीं वसुदेवाला फारसा आदर नव्हता. सांडांप्रमाणें जनतेच्या औदार्यावर पुष्ट होणारे आणि आपला बडेजाव कायम ठेवण्यासाठीं मंत्रतंत्राच्या अवडंबरानें लोकांना अज्ञानांत ठेवणारे हे लोक समाजशत्रू आहेत असें त्याला वाटायचें. या महंताच्या बतींतहि मंत्रतंत्राचा उल्लेख त्यानें ऐकलाच होता. शिवाय त्याच्याजवळ असलेली ती माई...! सर्वसंगपरित्याग केलेल्या आणि सहाहि मनोरिपूंचें निर्दालन करून बसलेल्या या संन्याशांना जवळ बाया कशाला लागतात कुणास ठाऊक ! कर्म करूनहि त्याविषयीं आसक्ति न बाळगण्याचा हा योगमार्ग फार सुखावह आहे खरा !

शेलारवाडी गांवापासून थोड्या अंतरावर, डोंगराच्या वाटेवरती एक छोटी धर्मशाळा होती. या धर्मशाळेंत वसुदेवानें आपलें बिऱ्हाड ठेवलें. गांवांतून साहित्य आणून त्यानें अन्नसिद्धि केली आणि जेवणखाण आटोपल्यावर बाहेरील ओट्यावर बसून तो आपल्या भविष्यकालाच्या योजना आंखूं लागला.

परंतु या विचारांच्या मार्गांत एक अज्ञात व्यक्ति वारंवार येऊन उभी राही आणि वसुदेवाचें लक्ष स्वत:कडे ओढून घेई. ही व्यक्ती म्हणजे रणकालीच्या गडावर वास करणारा तो संन्यासी. एखाद्या दैत्याप्रमाणें छाती पुढें काढून उभ्या असलेल्या समोरील पर्वताकडे नजर गेली कीं तो महंत या डोंगरावर कुठें राहत असेल, त्याच्याजवळ राहणारी ती तरुणी कशी असेल' ती लावण्यवती असेल काय, लावण्यवती असली तर त्या निर्जन ठिकाणीं

एखाद्या बैराग्याबरोबर राहणें तिला आवडत असेल का, वगैरे बरेवाईट विचार त्याच्या मनावर मधमाशांप्रमाणें हल्ला करीत.

महंताविषयीं वस्तुत: त्याची भावना तटस्थतेची होती. परंतु ही तटस्थता टिकविणें फार प्रयासाचें आहे असें त्याला आढळून येत होतें. दीपस्तंभावरचा दिवा सभोंवारच्या समुद्रावर अंमल गाजवीत असतो, साऱ्या आसमंतांतील रात्र केवळ त्याच्या तेजोमंडलाकडेच टक लावून बसलेली असते. त्याप्रमाणेंच रणकालीच्या गावथ्यापासचें सारें जग त्या संन्याशाच्या महात्मतेनें, त्याच्या-वरील निष्ठेनें भारून गेलेलें होतें.

● ● ●

सकाळींच तो धर्मशाळेंत आल्यावर एक वृद्ध गुराखी त्याची विचारपूस करायला सहज आला होता. वसुदेवाची परिस्थिति अजमावून तो गप्पा मारतां मारतां उठला आणि सभोंवारच्या जंगलांत जाऊन त्यानें लांकडाची एक मोठीथोरली मोळी आणून धर्मशाळेंत टाकली. चहा करण्याची वसुदेवाची इच्छा दिसतांच त्यानें गांवांत जाऊन त्याला आवश्यक ती सामग्री धांवतपळत आणून दिली. या सेवेबद्दल वसुदेव जेव्हां कांहीं पैसे त्याच्या हातावर ठेवूं लागला तेव्हां तो म्हणाला, "पैसे नको साहेब, जिवानं जिवाची सेवा करावी असं बाबाच सांगणं आहे!"

"कोण बाबा रे हा?" वसुदेवानें मुद्दाम अज्ञान दर्शवून विचारलें.

गुराख्यानें डोंगराकडे हात केला व तो भाविकपणें उद्गारला, "महंत-बाबा! या गडावर राहतो. साधुपुरुष तो—"

"अरे म्हाताऱ्या, कसले साधुपुरुष घेऊन बसला आहेस! तुम्हां अडाणी अशिक्षित लोकांना बुडविण्यासाठीं असे पुष्कळ गोसावडे—"

"महाराज!" तो म्हातारा हात जोडून पण थोड्या करारी आवाजांत म्हणाला, "तुम्ही कोण आहांत मला ठाऊक नाहीं. कदाचित् मोठे साहेब, मामलेदार, फौजदारहि असाल, पण हात जोडून विनंति आहे कीं बाबा-संबंधीं असं कांहीं बोलूं नका."

वसुदेवानें हरतऱ्हेनें दिलगिरी दाखविल्यावर तो म्हातारा पुन्हां पूर्ववत् मोकळेपणानें बोलूं लागला. तो म्हणाला, "साहेब, आम्हीं इकडचे लोक तर शुद्ध दगड, जनावरं आहोंत. पण बाबा म्हणतो कीं दगडांतसुद्धां देव आहे.

चार सालांपूर्वी या भागांत असा कडाक्याचा दुष्काळ पडला कीं, माणसं झाडाचीं पानं खाऊं लागलीं, डोंगरकपारींत मरून पडूं लागलीं. कित्येकांनीं पांचदहा शेर धान्यासाठी आपल्या बायकामुली सावकारांच्या तैनातीला दिल्या. कोणीं स्वतःचीं गुरं मारून खाल्लीं, कोणी चोऱ्यामाऱ्या करून तुरुंगांत गेले. अशा वणव्यांत आम्हांला बाबाशिवाय कोण त्राता होता? आपल्या राजाची गोष्ट अशी सांगतात कीं, दरबाराची सभा भरून तिनें दुष्काळ म्हटला तर तो म्हणतो दुष्काळ आहे, नाहीं तर कांहीं नाहीं! महंतबाबा कोणाची वाट पहात बसला नाही. अवसेच्या अंधारांत एकच मशाल नाचत राहावी त्याप्रमाणें या खेड्यांतून त्या खेड्यांत तो घरोघर फिरत होता, गोरगरिबांना मदत पोहोंचवीत होता!"

"कुठून आणली मदत त्यानें?" वसुदेवानें विचारलें.

"देवाचा हात त्याच्या डोक्यावर. त्याला नाहीं कोण म्हणणार? आमच्यासारखे शें–दोनशें लोक त्यानें गोळा केले आणि सर्वांना धान्य गोळा करायला लावलं. ज्याच्याजवळ शेरभर आहे त्यानें पावशेर दिलं पाहिजे असा कायदा काढला. शेटसावकारांच्या दारांत बाबा जाऊन उभा राहिला म्हणजे नुसत्या डोळ्याच्या जादूनं बळदांतलीं पोतीं त्याच्या पायाशीं येऊन पडत. शिवाय बाहेरूनहि आणतां येईल तेवढी मदत आणली. पडत्या आभाळाला हात देण्यासारखं होतं तें. पण तो देण्याशिवाय कोणतं गत्यंतर होतं? आणि बाबाशिवाय कोणाच्या हातामध्यें एवढं बळ होतं? ज्या ज्या गांवीं दुष्काळाचा जोर जास्त, तिथें बाबानं एक सामाईक स्वयंपाकघर उभं करायचं. सर्वांचे श्रम आणि सर्वांची भाकरी! कोठारांतलं धान्य अशा सामाईक स्वयंपाकघरांत वाटायचं. शिवाय त्या गांवांत कायद्यानें मिळणारा दाणागोटा त्यांत घालायचा गांवांतल्या बायांनीं भाकऱ्याच्या चळती उभ्या करावयाच्या आणि ज्यानं त्यानं त्यांतून आपली गरज भागवायची! शेंकडों लोकांचे जीव केवळ त्या महात्म्याच्या कृपेनें वाचले. जमीनदोस्त होऊं पहाणारे किती तरी संसार आपल्या हाताचा आधार देऊन त्यानें उभे ठेवले! इतर जगाचं काय असेल तें असो, पण आमच्या रहाळांत तर तोच सर्वांचा–निदान गोरगरिबांचा मायबाप आहे. तो डोंगरावर राहतो, कडेकपारींत बसतो, पण तिथून त्याच्या डोळ्याला सारं कांहीं दिसतं, त्याच्या

कानाला सगळं ऐकूं येतं. कुठें कुणी संकटांत असला कीं बाबा गड उतरून आलाच खालीं ! "

म्हातार्‍याच्या बोलण्यांत सत्यापेक्षां अंधश्रद्धाच अधिक आहे असें वसुदेवाला वाटलें. अंधश्रद्धा बाळगणार्‍याइतकेच ती निर्माण करणारेहि दोषी असतात असें त्याचें मत होतें. आणि तरीसुद्धां रणकालीवर राहणारा तो संन्यासी त्याच्या मनावर आपल्या कीर्तीनेंच स्वामित्व गाजवूं लागला होता यांत शंका नाहीं, परंतु त्याचें मन इतक्या सहजतेनें शरण जायला तयार नव्हतें. त्यानें गुराख्यास विचारलें, " बुवांजवळ बाई कोण आहे ! "

" बाई ! " गुराखी उद्गारला.

" महंताजवळ कोणी बाई राहते आहे म्हणतात ! "

" माई ? हां, माई आहे खरी "—

" म्हणजे ! माई काय बाई नाहीं वाटतं ? "

" बाई ? हां, म्हटलं तर बाईच आहे. मोठी भाग्याची बाई— "

माईच्या भाग्यासंबंधीं तो काय सांगणार होता तें अपुरेंच राहिलें. पायाला अकस्मात् कांहींतरी डसल्याप्रमाणें तो ताडकन उठून उभा राहिला आणि मोठ्यानें आरोळी मारून, कपाळावर हाताचा पंजा ठेवून डोंगराकडे बारकाईनें बघूं लागला.

" अरे काय, झालं काय एकदम ?" वसुदेव किंचित् भांबावून म्हणाला.

" आले! ते पहा "—गुराखी त्याचा हात धरून त्याला उठवीत उद्गारला.

वसुदेवानें त्याच्या हाताच्या दिशेनें पाहिलें. प्रथमतः त्याला कांहींच दिसलें नाहीं. पण नीट नजर लावून पाहिल्यावर क्षणभरानें त्यालाहि दिसूं लागलें. डोंगरांतील काळ्या पहाडाच्या पार्श्वभूमीवर एक भगवा ठिपका झरझर खालीं उतरतांना दिसत होता. खालीं उतरण्याच्या गतीबरोबर त्या ठिपक्याचा आकार अधिकाधिक मोठा होत होता. पुढें पहाडांतला रस्ता खालच्या दरडीला मिळाला. तेथल्या झाडाझुडपांच्या गर्दींत आणि वळणामध्यें, मानवी स्वरूप धारण करूं ल . ला तो भगवा बिंदू एकाएकीं अदृश्य झाला.

अंगाला बांधलेल्या कसल्यातरी शृंखला एकदम तुटल्याप्रमाणें तो म्हातारा

गुराखी हातवारे करीत सैरावैरा धांवूं लागला आणि तारस्वरांत ओरडूं लागला, "ए म्हाद्या ! ए रत्ने ! ए म्हाद्या ! ओ कारभारी !—

● ● ●

दहा मिनिटांच्या आंत चार दिशांनीं चाळीस–पन्नास स्त्रीपुरुषांचा जमाव तेथें येऊन उभा राहिला. शरपंजरीं पडलेले कांहीं म्हातारे होते त्यांत. हातांतली काठी म्हणजे तिसरा पाय आहे असें समजून आणि तितक्याच स्वाभाविकपणानें तिचा उपयोग करीत ते धांवत आले होते. त्यांचीं शरीरें म्हणजे काळ्या, विटक्या कातडींत गुंडाळलेल्या हाडांच्या मोळ्या. पण त्यांच्या त्या जीर्ण नजरेंतहि गुराख्याच्या हांकेमुळें कांहीं विलक्षण तजेला निर्माण झालेला होता. कांहीं तरुण होते, कांहीं स्त्रिया होत्या, कांहीं मुलें होतीं. सर्वांचें दारिद्र्य त्यांच्या अंगाखांद्यांवरून दुथडी वाहत होतें. पुरुषांपैकीं कांहींच्या डोक्यावर दोनचार वितीचीं तांबडीं मुंडाशीं होतीं, इतरांच्या मस्तकांवर राठ केसांच्या जाळ्यांनींच मुंडाशांचें कार्य भागवलें होतें. कमरेभोंवतीं आवळलेल्या आखूड धोतरांशिवाय अनेकांच्या अंगाला इतर वस्त्रांचा संपर्क झालेला नव्हता. स्त्रियांची अवस्थाहि फारशी वेगळी नव्हती. जेमतेम लज्जा झांकण्यापुरती वस्त्रें त्यांच्या शरीरावर होतीं. तीहि पुन्हां त्या विशिष्ट जगांतील लज्जा. वसुदेवाच्या मनांत विचार आला, लज्जा ही गोष्ट वस्त्रांच्या विपुलतेबरोबर विस्तार पावत असावी ! पांढरपेशा वस्तींत, स्त्रियांनीं आपली मांडी अथवा छाती राजरोसपणें उघडी टाकणें हें किती विचित्र समजलें गेलें असतें ! पण या स्त्रियांना त्यांत कोठलाहि संकोच वाटत नव्हता. स्त्रीशरीराची लज्जा त्यांनीं आपल्या आर्थिक परिस्थितीनुसार अत्यंत संकुचित करून ठेवली होती.

मांत्रिकाच्या हाकाऱ्याबरोबर सभोंवारच्या आवारांतून एकदम भुतांचा थवा चहूंबाजूंनीं धांवत यावा, त्याप्रमाणें ते लोक अकस्मात् कोठून तरी धांवत पळत आले होते. हे लोक जवळपास कोठें असतील अशी कल्पनासुद्धां वसुदेवाला आली नव्हती. गुराख्याच्या हांकेचा अर्थ सर्वांना समजलेला होता. नव्हे, तो अर्थ समजला होता म्हणूनच ते जीव तोडून, होते त्या अवस्थेंत तेथें धांवत आले होते. गुराख्यानें डोंगराकडे हातवारे करून त्यांना ती वार्ता कळवली. त्याबरोबर, तो सगळा जमाव समोर धांवूं लागला. म्हातारे काठ्या

टेकीत पळाले, तरुण आपल्या शरीरशक्तीचा फायदा घेऊन ईर्षेनें अग्रभागीं गेले, बायकांनीं आपलीं मुलें गाठोड्याप्रमाणें पाठीवर टाकलीं आणि त्याहि धांवूं लागल्या. सर्वजण डोंगरांच्या पायथ्याकडे गेले.

वसुदेव एकटाच जागच्याजागीं उभा होता. कां कोणास ठाऊक, त्याच्या अंतःकरणांत कांहींतरी कालवाकालव झाली आणि डोळ्यांत पाणी तरारून आलें. हातापायाच्या काड्यांवर उभें असलेलें, कृश पोटाचें व वस्त्रहीन दारिद्र्यच गडाच्या पायथ्याकडे धांवत आहे असें त्याला वाटलें. दारिद्र्याचा इतका अभद्र आविष्कार आज प्रथमच त्याच्या दृष्टीला अशा तीव्रतेनें दिसला होता. पण त्याच्या पोटांत कालवून आलें तें त्या दारिद्र्याच्या दर्शनामुळें नव्हे, तर त्या दारिद्र्यांतहि जतन झालेल्या भक्तीच्या भावनेनें. डोहाच्या मेलेल्या उदासीन पाण्यावर, एखादें मोठें थोरलें पांढरें कमल आपल्या पाकळ्यांचा संसार उघडून बसावें, त्याप्रमाणें ती भावना वाटली त्याला. त्यांच्या त्या मृतप्राय जीवनालाहि कसला तरी आधार होता! सामुदायिक भावनेचे असले आविष्कार पाहून नेहमींच त्याचें मन हेलावून जाई.

पण क्षणभरानें त्यानें स्वतःस सांवरून घेतलें. स्वतःच्या मनक्षोभाचें त्याला हंसू आलें. काय, शहर सोडल्यावर आपण आपलें शिक्षण, आपली बुद्धि, आपले पूर्वसंस्कार या सर्वांचाच त्याग केला?

तो अशा मनःस्थितींत उभा असतां, घोळक्याबरोबर पुढें गेलेला तो वृद्ध गुराखी पुन्हां माघारीं धांवत आला. वसुदेवाजवळ येऊन तो आर्जवानें म्हणाला, " साहेब, चला माझ्याबरोबर. बाबाचें दर्शन घ्या एकदां. हल्लीं अगदीं कधीं-नवत येणारी संधि आहे ही! एकदां नजरेआड गेला कीं सहासहा महिने दिसायचा नाहीं!"

वसुदेव त्याच्यामागोमाग चालूं लागला. त्यानें विचार केला, या गोसाव्याला एकदां दुरून तरी पाहून घ्यावें.

डोंगराची चढण जेथून सुरू होत होती तेथें एका झाडाच्या आडोशाला तो छोटा जमाव अधीरतेनें उभा होता. वसुदेवहि त्यांच्या जवळ पण जरा बाजूला जाऊन उभा राहिला. त्या महंताला असें वाटायला नको कीं, आपण-हि यांच्यापैकीं एक आहोंत, त्याच्या दर्शनासाठीं आसावून गेलों आहोंत. आपण प्रवासी आहोंत, तटस्थ आहोंत, सहज गंमत पहायला येथें उभे

आहोंत असा आविर्भाव प्रगट करण्याचा प्रयत्न त्याच्या गात्रागात्राकडून अभावितपणें होत होता. महंत येण्याचा क्षण जसजसा जवळ येऊं लागला तसतसा त्याच्या मनांतील विरोधाचा, अश्रद्धेचा भाव अधिक संघटित होऊं लागला.

साऱ्या लोकांची नजर एकाग्रतेनें समोरच्या वाटेकडे लागली होती. सुमारें सव्वाशें फुटांच्या अन्तरावर त्या वाटेनें एकदम वळण घेतलें होतें. या जागे-वरून त्या वळणापलीकडचें कांहींच दिसत नव्हतें.

शेवटीं प्रतीक्षेचा अखेरचा क्षण संपला. हातांत मोठा थोरला दंड धारण केलेली आणि भगवें वस्त्र परिधान केलेली महंताची भव्य आकृति समोरच्या रस्त्यावर प्रगट झाली. सर्वांच्या गळ्यांतून जयजयकाराचे व स्वागताचे रांगडी घोष उसळले; डोळ्यांतून भक्तिप्रेमाची भावना ओसंडून आली. सर्वांचे हात छातीवर जुळून आले.

वसुदेव तटस्थपणानें, दोन्ही हाताची छातीवर मिठी घालून स्वस्थ उभा होता.

महंत जवळ आले आणि त्या लोकांच्या जमावापाशीं येऊन उभे राहिले. प्रत्येकजण पुढें येऊन त्याच्या पायावर डोकें ठेवूं लागला. स्त्रिया आपलीं लहान मुलें त्याच्या पायावर घालूं लागल्या. सस्मित मुद्रेनें ते प्रत्येकाची विचारपूस करून त्यास आशीर्वाद देत होते. सर्वजण त्याच्या भोंवतालीं जमून कोलाहल करीत होते.

म्हाताऱ्या गुराख्यानें वसुदेवाचा पुरता पाठलाग करण्याचा निर्धार केला होता. तो पुन्हां धांवतपळत व हातवारे करीत वसुदेवाकडे आला व म्हणाला, " साहेब, बाबाच्या पायावर डोकं ठेवून घ्या. पुन्हां लौकर असा योग यायचा नाहीं ! "

'नाहीं' म्हणून त्या भाविकांच्या मेळाव्यांत आपली अश्रद्धा व्यक्त कर-ण्याचा धीर वसुदेवास झाला नाहीं. एखाद्या यंत्रासारखा तो पुढें झाला. आपल्यापेक्षां वेगळ्या आणि वरिष्ठ जगाचा हा प्रतिनिधीहि बाबाला नम-स्कार करण्यासाठीं येत आहे असें पाहून, महंताच्या सभोंवारची गर्दी आदरानें दुभंग झाली. सर्वजण वसुदेवाच्या चेहऱ्याकडे बारकाईनें पाहूं लागले.

दुभागलेल्या गर्दीतून वसुदेव पुढें झाला आणि महंताजवळ जाऊन उभा राहिला.

महंताच्या पायांवर डोकें ठेवण्यासाठीं तो खालीं वाकणार, तेवढ्यांत महंतांनीं त्याच्या खांद्याला स्पर्श करून त्याला अडविलें.

"नमस्कार कशाला करतोस ? तुझ्या मनांत शंका आहे. आणि खरोखर ती योग्यहि आहे. या लोकांसारखा तूं नाहींस. त्यांचे नमस्कार घेऊन मला त्यांचं समाधान करावं लागतं. पण कोणीहि कोणाच्याहि पायावर डोकं ठेवायचं कारण नाहीं !"

वसुदेवानें दृष्टि उचलून महंताकडे पाहिलें. एखाद्या डोंगराच्या पायथ्याशींच आपण उभे आहोंत कीं काय असें त्याला वाटलें. परमेश्वरानें केवळ प्रभुत्व गाजविण्यासाठींच कांहीं माणसें जगांत पाठविलेलीं असतात. प्रभुत्व गाजवायला आवश्यक अशी आकृति, चर्या, आवाज वगैरे साधनें त्यांना दिलेलीं असतात. महंत अशा पुरुषांपैकींच होते. त्यांचा शब्द, त्यांच्या डोळ्यांतील अथांग स्नेह, त्यांची उंच धिप्पाड मूर्ति, निरामयतेच्या तेजानें निथळणारा त्यांचा गौरलाल अंगवर्ण–वसुदेवाला वाटलें, हें सारेंच कांहीं असामान्य आहे ! त्याची अश्रद्धा निमिषार्धांत गळून पडली. कानाकोपऱ्यांतील सारी दुर्बलता एकवटून वरती आली. तो आवेगानें खाली वांकला आणि महंताच्या पायाला त्यानें मिठी मारली.

महंतांनीं त्याला उठविलें आणि आपला विशाल दीर्घ बाहू त्याच्या खांद्यावर ठेवून ते म्हणाले, "कसली अस्वस्थता आली आहे तुझ्या मनाला ?"

वसुदेव कांहींहि उत्तरला नाहीं. आपल्या मनाचा पापुद्रान् पापुद्रा या माणसाला खोलून दाखवावा असें त्याला वाटत होतें. परंतु स्वतःच्या वाणीवर त्याची सत्ता राहिली नव्हती.

"ठीक आहे" महंत त्याची मनःस्थिति जाणून म्हणाले. "उद्यां इथं राहिलास तर सहज गडावरती ये. आपण गप्पागोष्टी करूं. मलाहि केव्हां केव्हां या निर्जनाचा कंटाळा येतो. कोणाशीं तरी खूप बोलावंसं वाटतं.. मी जातों आतां."

सभोंवारच्या लोकांचा निरोप घेऊन व सर्वांना आशीर्वाद देऊन, महंत

सडकेच्या रोखानें निघून नेले. जवळच असलेल्या झाडीमध्यें त्यांची आकृति अदृश्य झाली.

ते भाविक लोक जितक्या आकस्मिकपणें तेथें उपस्थित झाले होते, तितक्याच आकस्मिकपणें पुन्हां नाहीसेहि झाले. दहावीस मिनिटें गाजलेलें, गरजलेलें सारें वातावरण पुन्हां शांत झालें. तो म्हातारा गुराखीहि गुरांना हाकारे देत निघून गेला.

स्वप्नांतून उठवलेल्या माणसाप्रमाणें वसुदेव भांबावून रणकालीच्या डोंगराकडे पहात जागच्या जागीं किती तरी वेळ उभा होता. त्याला न कळत, त्याचे डोळे पाण्यानें भरून आले होते.

• • •

# ३

दुसऱ्या दिवशीं सकाळीं वसुदेव गडावरती गेला. महंतांची प्रत्यक्ष भेट झाल्यापासून त्याची मनोवृत्ति उल्हसित झाली होती. काहीं तरी दिव्य आणि असामान्य गोष्टीचें दर्शन झाल्यावर, माणसाच्या मनात त्यासबंधींचा उत्साह बराच वेळ रेंगाळत राहतो. त्या उत्साहाच्या प्रवाहात जीवनांतील लहानसहान किल्मिषें वाहून जातात आणि नवीन सामर्थ्याचा, नवीन उमेदीचा प्रत्यय येतो. अंत:करणाचा पक्षी एखाद्या गरुडाप्रमाणें अंधेऱ्या गुहेंतून बाहेर पडतो आणि आकाशांतील नीलिम्यावर आपले पंख पसरून अज्ञातामध्यें, त्यांत भरलेल्या प्रकाशामध्यें, भरारी घेण्याचा यत्न करतो. वसुदेवाच्या मनाची स्थिति अशीच झाली होती.

शेलारवाडीला तो आला होता तो कांहींशा भयविव्हल मन:स्थितींत. जें घडलें होतें त्याच्यापासून त्याला दूर जावयाचें होतें. आपण कशासाठीं जात आहोंत व पुढें काय करणार आहोंत, या प्रश्नांचीं उत्तरें त्याचीं त्याला सांपडत नव्हतीं. घर पेटलें आहे हें समजतांच आंतील माणसानें दिसेल त्या मार्गानें बाहेर उडी टाकावी, त्याप्रमाणें तो नाशिकची सीमा ओलांडून बाहेर आला होता. रणकालीजवळच्या त्या निर्जन धर्मशाळेंत त्याचें मन भीतीपासून पुष्कळ मुक्त झालें होतें यांत शंका नाहीं. पण भीतीची जागा अस्वस्थते-

नें घेतली होती. या अस्वस्थतेला कांहीं नांवगांव नव्हतें. केवळ शारीरिकच नव्हे, तर मानसिक निराधारतेमधूनहि निर्माण झालेली अस्वस्थता होती ती.

ज्या श्रद्धांभोंवतीं त्याचें जीवन फिरत होतें त्या आतां दिसेनाशा झाल्या होत्या. दिवा एकदम मालवला तर त्याच्याभोंवतीं फेऱ्या घालणाऱ्या पतंगांची अंधारांत जशी बराच वेळ तडफड चालते, तशीच तडफड त्याच्या जिवाची होत होती. समरभूमीपासून दूर आल्यामुळें, केव्हां केव्हां त्याला वाटायचें कीं आपण त्या समरभूमीवरच स्वतःला नष्ट करून घ्यायला हवें होतें; त्या स्थंडिलांतच स्वतःला जाळून घ्यायला हवें होतें. स्वातंत्र्य ही चीज अशी नाहीं कीं, जी बसल्या जागेवरून कोणाला प्राप्त होईल. एखाद्या दुसऱ्या उपासकाच्या ओंजळभर रक्तानें संतुष्ट होऊन स्वातंत्र्य अवतरत नाहीं हें खरें; परंतु आपल्या ओंजळभर रक्ताची जर प्रत्येकजण कृपणाप्रमाणें राखण करूं लागला तर तें कधीहि अवतरणार नाहीं हेंहि तितकेंच खरें! झाडानें झाड पेटत जाऊन, सर्व वन प्रज्वलित करणारा वणवा अखेरीं सिद्ध होतो. वैयक्तिक त्यागाचें आणि बलिदानाचेंहि असेंच आहे. स्वातंत्र्यासारखें महान् ध्येय बलिदानाशिवाय कधींहि साध्य होत नाहीं आणि या बलिदानाला कोणीतरी प्रारंभ करावा लागतो. संसाराच्या क्षुद्र सुखदुःखांच्या चिखलामध्यें जे कृमिकीटकाप्रमाणें गुंतून पडले आहेत, ते बाहेर येऊन कधींहि कोणता त्याग करूं शकत नाहींत. सामान्यांच्या कक्षेपलीकडे असलेल्या त्या दिव्य प्रकाशाचें दर्शन ज्यांच्या दृष्टीला होतें, तेच त्याचा छंद घेऊन गरुडाप्रमाणें त्याच्यावर झेंप घालतात. जागेवर राहून ज्यांनीं हें धैर्य दाखविलें ते खरोखरच अलौकिक वीर होत.—आणि आपण ?

—सुरक्षित अंतरावरून आपण त्या ध्येयाची उपासना केली आणि शेवटीं त्या उपासनेची झळ लागण्याचा संभव निर्माण होतांच आपण आपल्या गांवापासूनच नव्हे, तर आपल्या ध्येयापासूनहि दूर पळालों. ही भीरुता नाहीं काय ? ज्या संसारी लोकांकडे, त्यांच्या कोंदट आणि खुजा भावनांकडे पाहून आपण तिरस्कारानें हंसत आलों, त्यांच्यांत आणि आपल्यांत खरोखरी काय फरक आहे ? विचारांचे बारीक पापुद्रे काढून आपण आपल्या वर्तनाचें समर्थन करतों. पण हें समर्थन खरें आहे का ? ज्या विचारांच्या आश्रयानें आपण हें समर्थन करतों, त्यांच्यावर तरी आपण निष्ठा दाखविली आहे काय ?

भीरुता ही अनेकदां विचारशीलतेचा मुखवटा चढवूनच जगांत वावरत असते. आपली विचारशीलता अशीच होती काय ?

समुद्रामध्यें लाटांवर लाटा अखंडपणें उठत असतात. एक पुढें जाऊन विरून जातांच दुसरी तिची जागा घेते आणि तिच्या पाठोपाठ तिसरी धांवत येते. वसुदेवाच्या मनांत हेलकावत असलेल्या विविध विचारांचें व प्रश्नांचें तांडव अशाच स्वरूपाचें होतें.

हें सारें तांडव महंतांच्या दर्शनानें थांबविलें होतें. खांद्यावर हात ठेवून 'कसली अस्वस्थता तुझ्या मनाला आहे' म्हणून त्यांनीं जेव्हां विचारलें, तेव्हांच ती अस्वस्थता मावळूं लागली. एका अमोघ प्रसन्नतेनें त्याचें मन व्यापून जाऊं लागलें. निराधारतेला कांहीं आधार मिळत आहे असें वाटलें. असें कां व्हावें याचें कारण त्याचें त्यालाहि कळत नव्हतें. मूर्तिभंजन करायला गेलेला मनुष्य, पुजारी होऊन त्या मूर्तीच्या पायाशीं बसावा असेंच कांहींसें हें झालें नव्हतें काय ? महंतांच्या जवळ जातांना त्याच्या मनांत अश्रद्धेशिवाय दुसरें कांहींच नव्हतें. पण त्यांच्या जवळ गेल्यावर, त्यांचा शब्द ऐकल्यावर, त्यांचा स्पर्श झाल्यावर, ती अश्रद्धा निखळून पडली आणि आपल्या बुद्धीच्या अणूरेणूंवर त्याच्या स्वामित्वाचे शिक्के पडत आहेत असें त्याला वाटलें.

धर्मशाळेच्या रस्त्यानें महंत पुन्हां परत गडावर जातील अशा कल्पनेनें त्यानें दिवसभर टेहळणी केली. परंतु महंत त्या रस्त्यानें आले नाहींत. सकाळच्या जमावांत असलेल्या एका माणसाजवळ सहज चौकशी करतां तो उद्गारला "त्यांना जायला यायला काय एकच रस्ता आहे कां ? जिथें त्यांचा पाय पडेल तेथें रस्ता." आपल्या भक्तांची गर्दी टाळण्यासाठीं महंत आडवाटेनें वरती गेले असावेत असा वसुदेवानें तर्क केला.

दुसऱ्या दिवशीं सूर्योदय झाल्यावर तो गडावर जाण्यास निघाला. सकाळच्या कोमल प्रकाशानें रणकालीच्या कठोरस्वरूपासहि कांहीं मृदुलता आलेली होती. उंच काळ्या पहाडांवरून, सोनेरी प्रकाश जागोजाग पाण्यासारखा झिरपत होता आणि कुठें उन्हांतून, कुठें छायेंतून, कुठें झाडाझुडपांतून तर कुठें काळ्याभोर खडकांतून जाणारी नागमोडी अरुंद वाट, विविध रंगाचें रेशिम एकत्रित केलेल्या लडीसारखी डोंगराच्या शरीरावर पडलेली दिसत

होती. वाऱ्याचा हळुवार आणि स्नेहमय स्पर्श सर्व चराचराला होत होता. उत्साहानें मार्गक्रमण करीत वसुदेव गडाच्या पठारावर जाऊन पोहोंचला.

● ● ●

मठाच्या दाराशीं जान्हवी सडासंमार्जन करीत होती. सडा घालणें झाल्यावर तिनें तळ्यावर जाऊन हातपाय धुऊन टाकले आणि जवळजवळ धांवतपळतच ती परत आली. बाबा आज लौकर परत यायचे होते, त्याच्या आंत सारें आटोपायला हवें.

आंत जाऊन तिनें रांगोळीचें भांडें आणलें व आज काय काढायचें याचा क्षणभर मनाशी विचार करून तिनें दाराच्या समोर कांहीं रेखाकृति काढण्यास सुरुवात केली.

वसुदेव जवळ येऊन उभा राहिला तरी तिच्या ध्यानांत आलें नाहीं. इतकी त्या चित्रलेखनांत ती तल्लीन होऊन गेली होती.

“ स्वामीजी इथंच राहतात का ? ” वसुदेवानें विचारलें.

“ काय—कोण ? ” जान्हवी दचकून वर बघत उद्गारली. हरिणासारखे नेत्र असणें ही गोष्ट केवळ कवींच्या कल्पनासृष्टींतच शक्य आहे असें वसुदेवाला वाटत असे. परंतु त्या मुलीचे वरती वळलेले, किंचित् कावरेबावरे झालेले ते विशाल काळेभोर डोळे पाहून हरिणाच्या डोळ्यांचीच माणसानें केलेली ही उसनवारी आहे असा त्याला भास झाला.

“ स्वामीजी इथेंच राहतात ना ? ”

“ हो हो ! इथेंच—” कपाळावर भुरभुरणारे केस अल्लडपणानें मागें सारून ती उभी राहिली. तिच्या नजरेंतला कावरेबावरेपणा क्षणभरांत नाहींसा झाला होता. मान किंचित् कलती करून तिनें रांगोळीच्या शुभ्राकृतीकडे एकवार पाहिलें आणि नंतर वसुदेवाकडे बघत ती एकदम उद्गारली, “ खरं सांगा बघूं, कशी आली आहे रांगोळी तें ! ”

“ रांगोळी ? ” वसुदेव कांहींसा चकित होऊन म्हणाला.

“ छान आली आहे फार ! फार सुंदर काढली आहेस ! ”

“ कांहीं तरी सांगतां ! खोटं—” जान्हवी म्हणाली.

“ नाहीं, नाहीं ! अगदीं ख ं आहे. इतकी सुंदर रांगोळी मीं तरी कधीं पाहिली नव्हती ! ”

" अस्सं ? मग बघितल्याबरोबर नाहीं बोललांत तें ? मी विचारायची कां वाट पाहिलीत ? "

" म्हटलं आपली ओळख नाहीं—" वसुदेव किंचित् गोंधळून म्हणाला.

" ओळख ! .." तिच्या जगांत अपरिचित असलेली गोष्ट कानावर पडत असल्याचा आविर्भाव करून ती म्हणाली.

" अन् मग ओळख नसतांना मला कसं विचारलंत, कीं स्वामीजी इथं राहतात का म्हणून ? "

" मग कुणाला विचारायचं, कोण आहे इथं दुसरं ? "

" कां ? त्या दगडांना विचारायचं, या झाडाला विचारायचं ! "

" त्यांना बोलतां येतं वाटतं ? "

" हो ! येतं तर काय झालं !" जान्हवी खेळकरपणानें हंसत उद्गारली. " बाबांना ठाऊक आहे का तुम्ही येणार आहांत तें ? "

" हो, त्यांनींच यायला सांगितलं ! "

" तरीच आज लौकर परत येणार म्हणून सांगितलं ! आतां आले म्हणजे बोलणारच नाहीं त्यांच्याशीं; मला सांगून ठेवायला नको होतं वाटतं ? "

तिनें वसुदेवाकडे किंचित् रोषानें पाहिलें. जणूं तिला ती गोष्ट न सांगण्याच्या कारस्थानांत तोहि सामील होता. कांहीं तरी समजूत घालायला हवी अशा आविर्भावानें तो म्हणाला, " घरांत दुसऱ्या कोणाला तरी सांगन ठेवलं असेल ! "

" कोण आहे दुसरं इथें ? " आपल्याला माहीत नसलेली गोष्ट तुमच्याकडून समजून घ्यायला आपण तयार आहोंत असा भाव तिच्या शब्दांत व नजरेंत होता.

" कोणीच नाहीं दुसरं ? "

" नाहीं, कुणीच नाहीं ! "

" त्या त्या..माई कुठें आहेत ? " वसुदेव किंचित् चाचरत म्हणाला.

" माई ? माई तर इथेंच आहेत ! "

" आंत आहेत ? "

" आंत नाहीं. बाहेरच आहे. तुमच्याशीं बोलते आहे. " वसुदेव आश्चर्यचकित झाला.

" म्हणजे तुम्ही–तूंच का माई ? "

" हो, माझं नांव जान्हवी आहे. पण गडाखालचे लोक माई म्हणतात मला ! "

" अस्सं ... मला वाटलं—" वसुदेव कांहींसा स्वतःशींच उद्गारला, " माई म्हणजे कुणी बाई आहे वाटतं ! "

" मी बाई नाहीं का ? "

" आहेस तर ! पण लहान, छोटी बाई आहेस अजून ! " वसुदेव हंसून उत्तरला.

" बरं, असूं दे छोटी ! " जवळ असलेल्या एका छोटया लतामंडपांत आपला हात खुपसून जान्हवी म्हणाली, " मी लहान काय अन् मोठी काय, तुम्हांला काय त्याचं ? "

वसुदेव पुन्हां गोंधळांत पडला. निर्जनांत राहिल्यामुळें या मुलीला वाऱ्याशीं भांडण करण्याची संवय आहे का ? कीं रुसण्याफुगण्यासाठीं आतुर असलेला तिचा स्त्रीस्वभाव या दुर्मिळ संधीचा फायदा घेऊन आपली गरज भागवीत आहे ? पण कांहींहि असलें तरी तिच्या या बोलण्याचालण्यांत आणि हाव-भावांत एक विलक्षण मोहकता होती यांत शंका नाहीं. मोकळ्यावर बांधलेलें लहान वासरूं अंगावर पान पडलें तरी एकदम उशी घेऊन लढाईचा पवित्रा घेतें. तिचें बोलणें अशा वासरासारखेंच होतें. उशी घेण्यासाठीं कोणत्या तरी निमित्ताचा तें सतत शोध घेत होतें.

" महंत केव्हां येतील ? "

" आतां येतील. बसा ना इकडे, " आपल्या यजमानकर्तव्याची जाणीव होऊन जान्हवी म्हणाली, " वेड्यासारखी मी आपली बाहेरच बोलत राहिलें."

तिच्या गोऱ्या लालसर गालांनीं दत्तक घेतलेला राग क्षणभरांत नाहींसा झाला. वेगानें समेकडे जाणाऱ्या मधुर गीतालापाप्रमाणें ती धांवतपळत आणि स्मित करीत घरांत गेली.

घरांतून एक मृगाजिन घेऊन ती बाहेर आली. दाराजवळच्या जागेंत वासे रोवून आणि त्यावरती वेली चढवून एक मांडव घालण्यांत आलेला होता. चहूंबाजूंनीं दाट पर्णभार असलेल्या वेलींचा वेढा असल्यानें त्या मंडपास, पानांनीं बांधलेल्या हिरव्यागार खोलीचेंच स्वरूप आलें होतें. प्रवेशासाठीं

मांडवाचा थोडासा भाग मोकळा ठेवलेला होता व त्यावरती एक चटईचा पडदा टाकलेला होता. हा पडदा जान्हवीनें गुंडाळून घेतला. ती आंत गेली. वसुदेवहि तिच्या पाठोपाठ आंत गेला.

मांडवाच्या आंत चारी बाजूना विटांचे अरुंद ओटे होते. त्यापैकीं एका ओटयावर जान्हवीनें मृगाजिन पसरलें आणि ती म्हणाली, "बसा, मी आतां येतें हं !"

तें पर्णग्रह वसुदेवाच्या डोळयांना अत्यंत आल्हाददायक वाटलें. त्या चार हिरव्या भितींनीं प्रसन्नता व शांतता या अमूर्त गोष्टी आपल्या हृदयाशीं कवटाळून ठेवल्या होत्या. एका ओटयाच्या कोपऱ्यांत महंतांची बसण्याची जागा होती. तेथें एक प्रशस्त मृगाजिन अंथरलेलें होतें व जवळ आठदहा लहानमोठया पुस्तकांची एक रास पडलेली होती. ओटयाजवळ ओबडधोबड लांकडाची एक तिपाई होती. तिपाईवरहि कांहीं ग्रंथ व लेखनाचें मोजकें साहित्य होतें. वसुदेवाच्या मनांत विचार आला, ज्ञानसाधनेला इतकें योग्य आणि रम्य ठिकाण फार थोडया लोकांच्या प्रारब्धांत असेल.

परंतु त्या अल्पकालीन एकांतांत त्याचें मन कोणत्या एका विचारानें विशेष व्यापून गेलें असेल तर तें जान्हवीसबंधींच्या. माईचें नांव प्रथम त्यानें ऐकलें तेव्हा त्याला वाटलें होतें कीं, स्वामींच्या परमार्थाला गृहसौख्याची किनार लावणारी ही कोणी तरी प्रौढ स्त्री असावी. महंतांची भेट होऊन त्यांच्याविषयीं मनांत आदरभाव निर्माण झाल्यावरती या विचाराचें स्वरूप पालटलें. पण तो पूर्णतः नाहींसा झाला नाहीं. केव्हां साशंकतेच्या तर केव्हां समर्थनाच्या धारा त्याच्यामध्यें मिसळू लागल्या. त्याला वाटे, कोणी स्त्री महंताजवळ असली म्हणून काय बिघडलें ? शरीरवासनांवर ज्यानें विजय मिळविला आहे अशा सिद्ध पुरुषाला स्त्रीच्या सहवासाची काय भीति वाटणार ? उलटपक्षीं, विकारांना अवसर नसल्यानें स्त्रीच्या स्वभावांत असलेल्या विशुद्ध स्नेहमयतेचा निःशंक चित्तानें तो आधार घेऊं शकतो. आणि समजा, तुला वाटलं तें खरं आहे, तरीहि काय बिघडलं ? ईश्वरसाधनेला स्त्रीच्या सहवासानं बाध येतो हा समज खुळेपणाचा नाहीं का ? पुराणांत मोठमोठया ऋषींनीहि विहित अविहित स्त्रीसंबंध केल्याच्या कथा आहेत. त्यांचें तेज आणि ज्ञान या संबंधांनीं काय जळून गेलें ? '

पण जान्हवीला पाहिल्यावर हें सारेंच अकारण होतें हें त्याला कळून आलें. साशंकतेला अवसर नव्हता आणि समर्थनाचीहि आवश्यकता नव्हती. चवदा-पधरा वष वय असलेली ही मुलगी एखाद्या मांजराच्या पिलाप्रमाणें महंतांच्या पायांशीं खेळत असेल. जान्हवी स्वरूपानें आकर्षक होती यांत शंका नाहीं. गव्हाप्रमाणें गोरा असलेला अंगवर्ण, तरतरीत चेहरा आणि विशाल भावदर्शी डोळे हीं तिच्या रूपाचीं वैशिष्ट्यें होतीं. त्यांत असामान्य लावण्य नव्हतें; परंतु मोहकता होती हें निर्विवाद. परंतु या स्वरूपावरती यौवनानें आपले रस आणि गंध अद्याप शिपडलेले नव्हते. कळ्यांचींच फुलें होतात हें खरें असलें तरी मधुकरांना ओढून आणण्याचें सामर्थ्य कांहीं कळ्यांत असूं शकत नाहीं. त्या-साठीं पाकळ्या उकलाव्या लागतात, सुगंध दर्वळावा लागतो, आंतल्या गाभ्यांत मकरंदाचे नाजुक थेंब निर्माण व्हावे लागतात. या लालित्याचा स्पर्श अद्याप जान्हवीच्या स्वरूपास झालेला नव्हता. बाल्याच्या सरहद्दीवर उभी असलेली ती एक निर्व्याज, अल्लड आणि खेळकर मुलगी होती. महंतांच्या विशाल अंतःकरणांत तिच्याविषयीं वात्सल्याशिवाय दुसरी कोणती भावना असूं शकणार? आकाशांत डोकें घालून बसलेल्या उत्तुंग वडाच्या छायेंत अनेक झुडपें व वेली निर्धास्तपणें जगत असतात. त्याच्या खालीं येणाऱ्या पारंब्या त्या आश्रितांची प्रेमानें चौकशीहि करीत असतात. पण म्हणून त्या वटवृक्षाचें चित्त काय त्या झुडुपांत आणि वेलींत गुंतलेलें असतें? त्याचें जीवन तर सदैव आकाशाचाच वेध घेत बसलेलें असतें..

● ● ●

जान्हवी पुन्हां पर्णगृहाच्या दारांत येऊन उभी राहिली. दोन्ही हात मागें नेऊन तिनें कांहीं तरी लपवून ठेवल्यासारखें दिसत होतें.

"एक गंमत दाखवूं का तुम्हांला!"

"दाखव कीं—"

"पण हंसायचं नाहीं!"

"नाहीं हंसणार! काय आहे तें?"

"चित्र आहे एक—"

"अरे वा! तूं काढलेलं?"

"काढलेलं नाहीं, केलेलं आहे. चांगलं नाहीं पण तें!"

" पाहिल्याशिवाय कसं कळणार तें ? बघूं या तर खरं. "

ती पुढें आली आणि मागचे हात हलकेच पुढें आणून वसुदेवाच्या समोर तिनें तें चित्र ठेवलें. साध्या मातीपासून तयार केलेलें हत्तीचें चित्र होतें तें. चित्रांत विशेष सफाई नसली तरी ओबडधोबडपणाहि नव्हता. बारीक कला-कुसर करण्याचा प्रयत्न त्यांत दिसून येत होता. हत्तीला काळा रंग दिला होता व पांढऱ्या रंगानें त्याचे डोळे, अंगावरची झूल, कपाळावरील बिंदी वगैरे गोष्टी काढल्या होत्या.

वसुदेवानें चित्र समोर ठेवलें व चहूबाजूंनीं आपण बारकाईनें पहात आहोंत असा बहाणा करून तो उद्‌गारला, " वा ! छान ! "

" सुंदर ! फारच सुंदर ! इतकं सुंदर चित्र मीं कधींच पूर्वी पाहिलं नव्हतं, असंच ना ? " रांगोळीवरील त्याच्या अभिप्रायाची नक्कल करीत जान्हवी म्हणाली.

" म्हणजे मी काय खोटं बोलतों वाटतं ? "

" सगळे लोक खोटं बोलतात ! अगदीं इलाजच नसला तर खरं बोलतात ! "

" अगदीं सगळे लोक ? "

" बाबांशिवाय ! "

" ते काय म्हणाले ? "

" ते हंसले अन् म्हणाले, फुकट माती घालवलीस ही ! जागच्याजागीं पडली असती तर थोडं गवत तरी उगवलं असतं तिच्यांत ! " महंतांचा हा अभिप्राय सांगतांना तिचा चेहरा गोरामोरा होऊन गेला होता. पण तो सांगितलाच पाहिजे अशा स्वरांत ती सांगत होती.

" थट्टा केली असेल त्यांनीं ! "

" थट्टा कसली ? खरंच आहे तें, अगदीं वाईट चित्र आहे तें. मी तें मोडूनच टाकणार आहे मुळीं ! "

" भलतंच ! इतकं छान चित्र मोडून टाकायचं ! "

बुडत्याला काडीचा आधार हवाच होता. एकदम पवित्रा बदलून जान्हवी म्हणाली, " खरंच चांगलं आहे ? "

" अगदीं खरंच— "

"मला खूप चित्रं करावींशीं वाटतात. देवीचं, वाघाचं, डोंगराचं! बाबांचंसुद्धां चित्र करावंसं वाटतं. तुम्ही इथं राहिलांत तर तुमचंसुद्धां करीन चित्र!"

"पण मी कुठं इथं राहणार आहें! महंतांशीं थोडा वेळ गप्पा मारून लगेच जाणार आहें मी!"

"खरंच जाणार आहांत?"

"हो तर!"

"कुठं जाणार?"

कुठे जाणार? वसुदेवाजवळ या प्रश्नाचें उत्तर नव्हतें. पण इथें राहण्याची जी एक नवी कल्पना जान्हवीनें त्याच्यासमोर उभी केली होती ती मनोवेधक होती यांत शंका नाहीं.

"गुप्त आहे वाटतं?"

"तसं नाहीं. जाईन कुठं तरी पुण्यामुंबईला."

"मुंबई! खूप मोठं गांव आहे ना तें? पाहिलं आहे तुम्हीं?"

"हो. पुष्कळदां!"

एकदां नव्हे तर पुष्कळदां! मुंबई पुष्कळदां पाहूं शकणाऱ्या या माणसाविषयीं जान्हवीला आदर वाटला आणि तिच्या डोळ्यांत तो प्रगटहि झाला.

"तिथे म्हणतात फार उंच उंच वाडे आहेत, मोठा समुद्र आहे, गांवांत आगगाड्या आहेत, मोठालीं जहाजं आहेत—खरंच, जहाज कसं असतं हो?"

"जहाज ना! खूप मोठं असतं. पाण्यांत चालतं तें!"

"अस्सं होय!" जान्हवी डोळे विस्फारून छद्मीपणानें म्हणाली. "नवलच आहे बाई! मला वाटलं, जहाजं पंख लावून आभाळांत उडतात कीं काय!"

जहाजासंबंधीं योग्य ती माहिती आपल्याला पुरवतां आली नाहीं हें लक्षांत येऊन वसुदेव किंचित् खजील झाला. तें ध्यानांत येऊन कीं काय जान्हवी मोकळ्या मनानें हंसली. त्या हास्याच्या धारेंत तिनें पूर्वींचे आपले सारे प्रश्न बुडवून टाकले, वसुदेवाचा संकोचहि बुडवून टाकला. नंतर एकदम गंभीर होऊन ती म्हणाली, "द्या तें चित्र. बाबा आले!"

"कुठं? तूं तर आंत आहेस—"

" मला ऐकूं येतं. ते लांब असले तरी ऐकूं येतं. " तिनें चित्र उचललें व बाहेर जातां जातां मागें वळून ती म्हणाली. " बाबांना सांगायचं नाहीं हं चित्राबद्दल ! "

" सांगेन. "

" सांगा. मी लगेच फोडून टाकीन तें ! "

" बरं, नाहीं सांगणार ! "

जान्हवी बाहेर गेली आणि थोड्याच अवकाशांत महंतांची दंडधारी मूर्ति वर्णगृहाच्या दारांत येऊन उभी राहिली. वसुदेव उठला आणि पुढें जाऊन त्यानें महंतांच्या पायांना अभिवादन केलें. महंतांनीं त्याला दोन्ही हातानीं उठविलें आणि त्याच्या नजरेला आपली तेजस्वी दृष्टि खिळवून ते स्मित करून म्हणाले,

" कालची साशंकता आज दिसत नाहीं ! "

" कालच्या साशंकतेबद्दल क्षमा करा ! "

" क्षमा कसली आली आहे ? मला काय नमस्कारांची भूक थोडीच आहे ? तुझ्या मनस्थितींत कांहीं बदल झाला इतकंच विशेष वाटतं आहे मला. "

" होय, झाला आहे खरा ! "

महंत आपल्या आसनावर बसले.

" जान्हवी ! " त्यांनीं हांक मारली.

जान्हवी त्यांच्याजवळ येऊन उभी राहिली.

" जान्हवी, पाहुण्यांना काय दिलंस ? "

" कांहीं नाहीं ! "

" कांहींच नाहीं ? दूधसुद्धां ! "

" नाहीं. ठेवलंय् गरम करायला ! "

" मग चित्र दाखवलं असशील ! "

" हो, दाखवलं. " जान्हवीनें कबुलीजबाब दिला. एक हात पसरून जान्हवीला जवळ घेऊन महंत म्हणाले, " आमच्या जान्हवीला कलावंत व्हावंसं वाटतं ! "

" कांहीं तरीच काय बोलतां बाबा ? " जान्हवी घुसफुसून म्हणाली.

" त्यांत काय वाईट आहे ! कलावंत म्हणजे परमेश्वराचे पृथ्वीवरील

सर्वांत लाडके पुत्र. त्यांच्यांतलं ईश्वरी बीज अधिक जागृत असतं. म्हणूनच कांहीं तरी निर्माण करण्याची प्रेरणा होते त्यांना ! पण तुझा तो हत्ती कांहीं आपल्याला आवडला नाहीं बुवा. त्याची सोंड कोणती व पाय कोणते कांहीं ध्यानांत येत नाहीं ! ”

महंत मोठ्यानें हंसले. आपली उग्र वृत्ति विसरून सिंहानें घटकाभर सशाच्या पिलाशीं क्रीडा करावी असें तें दृश्य पाहून वसुदेवास वाटलें.

“ मी मुळीं फोडणारच आहे तें ! ” जान्हवीनें आपलें ठेवणींतलें अस्त्र काढलें.

“ वेडी ! अग मीं थट्टा केली तुझी. छान चित्र आहे तुझं. जा आतां पाहुण्यांसाठीं दूध घेऊन ये ! ”

जान्हवीच्या साऱ्या शरीरांत विजा सळसळत होत्या. महंतांचा खरा अभिप्राय कळला. वसुदेवाकडे आनंदभरानें पहात ती आंत पळतच गेली.

“ सांग तुझी हकीगत—” महंत एकदम वसुदेवाकडे वळून म्हणाले. “ कसलं ओझं मनावर घेऊन हिंडतां आहेस तूं ? ”

आपली हकीगत सांगण्याचा पूर्वविचार वसुदेवानें खरोखर केलेला नव्हता. परंतु महंतांच्या शब्दांतील स्नेहमय आमंत्रण नाकारण्याचें सामर्थ्य त्याच्याजवळ नव्हतें. तो सांगूं लागला. महंतांच्या सान्निध्यामुळें आपल्या वाणीला नवें बळ येत आहे असें त्याला वाटलें. इतकें तो कोणाजवळहि बोलूं शकला नसता. पण महंतांसमोर तो बोलूं लागतांच त्याच्या वाणीनें त्याच्या अंतःकरणांतले सारे अनुभव, साऱ्या शंका, सारे विचार वरती ओढून आणले व ते त्या सामर्थ्यवान् पुरुषासमोर उभे केले. सूर्य माध्यान्हीं आला तरी त्याची हकीगत संपली नाहीं. काळोखांत गवसलेल्या वाटसराला कोणींतरी दुरून कंदील दाखवून आपल्यामागें यायला लावावें त्याप्रमाणें अधूनमधून कांहीं विचारून, कांहीं विवेचन करून महंत त्याला बोलायला, आपलें हृदय मोकळें करायला लावीत होते.

“ आतां कुठें जाणार आहेस? ”

“ कांहीं ठरलं नाहीं. कुठें तरी जाईन! ”

“ कुठेंहि जाणार असलास तर इथें रहा ! ”

“ इथें ? ” वसुदेव स्तिमित होऊन म्हणाला.

"मी तुला संन्यासी व्हायला सांगणार नाहीं. तुला वाटेल तितके दिवस रहा. कंटाळा आला कीं निघून जा. इथें धोका नाहीं!"

वसुदेवाचें हृदय कृतज्ञतेनें भारावून गेलें. भविष्याची त्याला फारशी चिंता नव्हती. नांवगाव बदलून आपण कुठेंहि कांहीं वर्षें काढू आणि परिस्थिति निवळल्यावर परत आपल्या जगांत जाऊं असा त्याला विश्वास वाटत होता. परंतु भविष्य इतकें उज्ज्वल स्वरूप घेऊन आपल्यासमोर उभें राहील अशी त्याची अपेक्षा नव्हती.

● ● ●

# ४

रणकालीचा डोंगर अडीच-तीन हजार फुटांहून कांहीं अधिक उंच नसेल. पण त्याच्या पठारावर राहणाऱ्या वसुदेवाला आपण स्वर्गांतच रहात आहोंत कीं काय असें वाटे. केव्हां तरी शेलारवाडीच्या बाजूला असलेल्या कड्यावर येऊन तो उभा राही. त्याच्या मनांत विचार येई, या दोन जगांमध्यें केवढें अंतर आहे? एका उंच दीपस्तंभाच्या मनोऱ्यावर तो बसला होता आणि खोल खालीं, सर्वत्र पसरलेल्या समुद्राचें भयानक, आर्त तांडव चाललेलें होतें. लाटांवर लाटा आदळत होत्या आणि फुटत होत्या. विच्छिन्न झालेल्या लाटांच्या चिंध्या आकाशांत उडत होत्या. आवेशानें वाहणारे वेगवेगळे जल-प्रवाह परस्परांशीं झुंजत होते, परस्परांना तुडवीत होते. घोंगावत येणारें तुफानी वारें पाण्यावर सारखे प्रहार करीत होतें. सगळा कोलाहल, सारी अशांतता, सारा प्रक्षोभ! परंतु ज्या ठिकाणीं तो होता तेथें मात्र या अशांत-तेचा संपर्क नव्हता. खालीं काळोख आणि वादळ यांची युती झाली होती, वरती शांतता आणि प्रकाश यांचें मीलन झालेलें होतें.

महंताच्या जवळ राहणें म्हणजे ज्ञानाच्या आणि तपश्चर्येच्या संगतींत राहण्यासारखें होतें. पुष्कळदां मोठ्या माणसांच्या जवळ गेलें म्हणजे त्यांचा मोठेपणा मावळून गेलेला दिसतो त्यांच्या थोरपणाला आपल्या चाहत्यांची जवळीक सहन होत नाहीं. महंतांच्या बाबतींत वसुदेवाला उलट अनुभव

आला. त्यांच्या व्यक्तित्वाची असामन्यता जवळून त्याला जास्त स्पष्टपणानें दिसूं लागली.

महंतांचा सहवास त्याला सतत लाभत होता असें मात्र नाहीं. त्यांची दिनचर्या कांहींशी तऱ्हेवाईक होती. पहांटे उठून व स्नानादि कृत्यें आटोपून सूर्योदय होण्यापूर्वींच ते बाहेर पडत. रणकालीच्या शेजारीं असलेल्या डोंगराच्या बाजूला एक दुर्घट कडा होता. या कड्यांत असलेल्या एका गुहेगारख्या जागीं ते जाऊन बसत आणि तपश्चर्या करीत असें जान्हवीनें एके दिवशीं हलक्या आवाजांत त्याला सांगितलें. माध्यान्हाच्या सुमारास ते परत येत, पुन्हां तळ्यावर जाऊन स्नान करीत, नंतर विशिष्ट स्वरूपाचा आहार करीत. आहार झाल्यावर घराच्या बाहेरच्या दालनांत किंवा पर्णगृहांत बसून ते जान्हवीशीं, वसुदेवाशीं गप्पा मारीत बसत. नंतर त्याच दालनांत ते एकटे बसून कांहीं वाचन-अध्ययन करीत व तीनच्या सुमारास बाहेर येऊन पुन्हां कोठल्या तरी अज्ञात स्थळीं जाऊन बसत, तें तिन्हीसांजा होईपर्यंत. एखाद्या दिवशीं सकाळीं गेल्यावर ते एकदम रात्रींच परत येत असत. कित्येकदां दोन-दोन तीनतीन दिवसहि ते बाहेर काढायचे. ते मधल्यावेळीं घरीं आले नाहींत म्हणजे जान्हवी म्हणायची, " आज बाबा स्वारीवर गेलेले दिसतात. "

" स्वारी कसली ? " वसुदेवानें एकदां विचारलें.

" गडाच्या खालीं बाबा गेले म्हणजे ते स्वारीवर गेले असं आम्ही म्हणतों ! "

" नेहमीं जातात का ते स्वारीवर ? "

" हो, नेहमीं जातात ! "

" आणि तूं इथं एकटीच राहतेस ! "

" हो, मग ? "

" तुला भीति नाहीं वाटत ? "

" आतां तुम्हीं आहांत कीं ! " जान्हवी किंचित् हंसून उद्गारली.

" मी आतां आहें. पण त्यापूर्वीं ? या निर्जनांत तुला कांहींच का भीति वाटत नसे ? "

" निर्जनांत कशाची भीति वाटणार ? पूर्वीं भीति वाटत नव्हती. उलट,

आतां तुम्ही आल्यामुळें मात्र वाटायला लागली आहे ! " किंचित् मिष्किल-पणानें जान्हवी म्हणाली.

" माझी भीति ! मी काय वाघ आहें का चोर आहें ? "

" चोराची महंतांच्या घरांत कसली भीति ? इथें आधीं चोर यायचा नाहीं आणि आला तर बाबांच्या आशीर्वादाशिवाय आणि माझ्या हातच्या जेवणाशिवाय त्याला कांहीं दुसरं मिळायचं नाहीं. वाघाचं म्हणाल तर माण-सानं भ्यावं असे वाघ इकडे नाहींतच. जे आहेत त्यांची धास्ती बाळगण्याचं कारण नसतं. तेच माणसाला भीत असतात. "

" मग कां म्हणून माझी भीति वाटते ? "

" तुम्ही पुरुष आहांत म्हणून ! " जान्हवी एकदम उत्तरली आणि नंतर खुदकन् हंसली.

वसुदेवाला काय बोलावें हें क्षणभर सुचेना. परंतु त्या चिमुरड्या पोरी-कडून त्याला पराभव पत्करायचा नव्हता. तोहि हंसून म्हणला, " मी पुरुष आहें खरा. पण तू काय मोठी स्त्री थोडीच आहेस ? तूं तर लहान, माझ्या मुलीसारखी आहेस कीं ! "

" मुलीसारखी ! " जान्हवी पुन्हां हंसत म्हणाली. " तुम्ही काय आजोबा झालां वाटतं ! " नंतर चेहरा गभीर करून आणि डोळे किंचित् विस्फारून ती म्हणाली, " असं कांहीं तरी बोलूं नका हं ! सगळ्यांना कांहीं मुली-सारखी नाहीं मी. फक्त बाबांना. बहिणीसारखी आहे असं म्हणा. तें चालेल— "

" बरं बुवा, बहिणीसारखी ! आतां नाहीं ना भीति वाटायची ? "

" नाहीं, नाहीं, नाहीं ! मी आपलं मौजेनं बोललें हं ! जगांत कसलीहि भीति मला वाटत नाहीं ! "

कोठल्या प्रश्नापासून वसुदेव निघाला होता आणि कोठल्या उत्तरापाशीं येऊन तो शेवटीं थडकला होता ! त्यानें एक खूणगांठ स्वतःच्या मनाशीं बांधली. जान्हवी आपल्या वयाहून मोठी आहे, आपल्या कालमर्यादेच्या पुढें गेलेली आहे...

महंतांच्या पायांत प्रवास करण्याची विलक्षण ताकद होती. दहापंधरा मैल दूर असलेल्या कोणच्या तरी घरीं ते सकाळीं उठून जात आणि संध्याकाळीं

पुन्हां परत येत. स्वारींतील त्यांचे उद्योग विविध असत. रोग्यांची शुश्रूषा हा त्यांतील प्रमुख. वैद्यकीची आणि औषधयोजनेची त्यांना माहिती होती. कोणी जास्त आजारी असलें तर रोज नियमितपणें ते त्याच्या घरीं जात आणि त्याची शुश्रूषा करीत शिवाय, कोणाला आर्थिक मदत करायची, कोणाला सल्लामसलत द्यायची, कोणाचें त्याच्या दुःखामध्यें सांत्वन करायचें वगैरे गोष्टीहि चाललेल्या असत. अपार दारिद्र्यानें, रोगांनीं आणि अज्ञानानें गांजलेल्या त्या रणकालीच्या पायथ्यानजीकच्या प्रदेशांत सारीं घरें त्यांचीं होतीं. आपल्याला मिळालेलें 'बाबा' हें नांव ते सार्थ करीत होते. एखाद्या दिवशीं अचानक ते कोणा तरी कोळ्याच्या, भिल्लाच्या किंवा चांभाराच्या घरीं जाऊन उभे राहत, आणि जेवायला द्या म्हणून सांगत. घरांत थोडेंफार कांहीं असलें तर अन्नापेक्षां प्रेमानेंच अधिक भरलेली थाळी त्यांच्या समोर येई. हृदय भारावलेलें आणि पापण्या ओलावलेल्या अशा अवस्थेंत घरांतील मंडळी त्यांच्याभोंवतीं जमत आणि आपली सुखदुःखाची कहाणी त्यांना सांगत. घरांत अन्न नसलें तर तें पुरविण्याची जबाबदारी महंत आपल्या अंगावर घेत. त्यासाठीं ते भिक्षा मागत व धान्याच्या किंवा पैशाच्या देणग्या गोळा करीत. गोरगरीबांना महंतांविषयीं अमाप प्रेम वाटत असे तर अधिक सुस्थितींत असलेल्या व्यापारी, जमीनदार, सावकार वगैरे वर्गांस त्यांच्या-संबंधीं प्रेमापेक्षां दराराच जास्त वाटायचा. त्यांच्या ज्ञानाची धांवहि कुंपणा-पर्यंतच असल्यानें महंतांत कांहीं अपूर्व, अतिमानवी सामर्थ्य आहे यावरती त्यांचाहि विश्वास होता. मला मणभर बाजरीची भिक्षा हवी, असा पुकारा करीत महंत एखाद्या जमीनदाराच्या किंवा व्यापाऱ्याच्या दाराशीं उभे राहिले म्हणजे आपल्यावर अनुग्रह झाला असें समजून तो त्यांच्या पायावर डोकें ठेवी व मागितलेली भिक्षा त्यांच्या स्वाधीन करी. या व्यति-रिक्त शेंकडों लोक गडावरती महंतांच्या दर्शनाला येत. त्यांच्याकडूनहि त्यांना कांहीं ना कांहीं प्राप्ति होत असे.

"ज्यांच्याजवळ वाजवीपेक्षां जास्त आहे त्यांना तें ठेवण्याचा अधिकार नाहीं," असें महंत एके दिवशीं गप्पा मारतां मारतां वसुदेवास म्हणाले, "ज्यांच्याजवळ कमी आहे त्यांना तें घेण्याचा हक्क आहे!"

पश्चिमेकडे हजारों मैलांच्या अंतरावर, अशाच कांहीं मतांचा प्रचार

करणारे पंथ अस्तित्वांत येत असल्याचें वसुदेवानें संदिग्धपणें ऐकलें होतें. परंतु त्याचें पुरेंसें आकलन त्याला झालें नव्हतें, होणेंहि शक्य नव्हतें. १९०९ साल होतें तें. दारिद्र्य, श्रीमंती वगैरे गोष्टी प्रारब्धावर अवलंबून आहेत असें गृहित धरणारा काळ होता तो.

"हक्क कसा असूं शकेल ?" वसुदेव म्हणाला. "जो मनुष्य जास्त कमावतो तो आपल्या भाग्यानें किंवा चातुर्यानें. तें त्याला ठेवावयाचा अधिकार कसा नाहीं ? त्यानें दयाबुद्धि ठेवून परोपकारासाठीं धनाचा त्याग करावा हें ठीक आहे. अशा परोपकारानें पुण्य मिळतें असें आपण मानतों. पण त्या अदृश्य पुण्याची गोष्ट बाजूला ठेवली तरी त्याला कांहीं आत्मिक समाधान मिळतें हें तर नक्कीच. परंतु हक्काची भाषा आली कीं हें समाधानहि त्याच्या धनाबरोबरच त्याच्यापासून हिरावून घेतल्यासारखें होईल."

"या समाधानाला आत्मिक समाधान म्हणायची प्रथा आहे." महंत म्हणाले, "पण हें खरोखर आत्मिक समाधान नव्हे. अहंकारांतून उद्भवलेलें हें समाधान असतें. एक वस्तु माझी आहे. तिचा मी दुसऱ्यासाठीं त्याग करतों म्हणजेच त्याच्यावर उपकार करतों. या विचारांत अहंकाराशिवाय दुसरें कांहींच नाहीं, आणि अहंकाराइतकी आत्मघातक दुसरी कोणतीहि गोष्ट नाहीं. म्हणून ज्या समाजांत परोपकाराची फार वाहवा होते आणि मोठ्या प्रमाणांत तो केला व घेतला जातो तो समाज रोगग्रस्त आहे असंच मानलं पाहिजे ! दानानं कुणाचंच कल्याण होत नाहीं, घेणाऱ्याचंहि नाहीं अन् देणाऱ्याचंहि नाहीं ! देणाऱ्याचा अहंकार वाढतो आणि घेणाऱ्याचं दास्य वाढतं !"

दास्य या शब्दाचा एकच जबरदस्त अर्थ वसुदेवाला ठाऊक होता. अत्यंत तीव्रतेनें तो अर्थ त्याच्या मनांत सतत जागा होता. तो अर्थ बाहेर काढून दास्याच्या या नव्या, संदिग्ध कल्पनांसाठीं मनाचा दरवाजा एकदम उघडून देणें त्याला शक्य नव्हतें. दुरूनच त्या कल्पनेशीं तो कितीतरी वेळ खेळत राहिला.

त्याला एवढें कळून चुकलें कीं, ज्या जगांतून तो आला होता त्यांत अपरिचित असलेल्या तत्वज्ञानाचा महंतांनीं आपल्या जीवनास आधार दिला होता. महंतांच्या पूर्वजीवनाविषयीं त्याला कुतूहल वाटूं लागलें. त्या पार्श्व-

भूमीवरतीच त्यांच्या मतांची संगति लागूं शकेल, त्यांच्या सध्यांच्या जीवनक्रमाचा अन्वय लावतां येईल असें त्यांस वाटलें.

महंतांशीं बोलतांना तो प्रत्येक वेळीं एकेक पाऊलच पुढें जाऊं शकत होता. एकदम धांवत जाऊन त्यांच्या अंतःकरणाच्या अथवा जीवनाच्या अंतरंगांत प्रवेश करण्याचें धारिष्ट त्यांच्यांत अद्याप आलें नव्हतें. परंतु जान्हवीची गोष्ट वेगळी होती. जान्हवी त्यांच्याशीं अगदीं मोकळेपणानें बोले व वागे. गडावरती नेहमीं कोणी ना कोणी लोक महंतांकडे येत व क्वचित् तेथें रहातहि. तेव्हां जान्हवीला त्या निर्जनांतसुद्धां अगदींच एकांतांत राहिल्यासारखें वाटे असें नाहीं; शिवाय, स्वयंपाक करणें, पाणी भरणें, सडासंमार्जनादि गृहकृत्यें करणें, परसांत असलेल्या गाईची व वासराची व्यवस्था ठेवणें इत्यादि गोष्टींत ती दिवसभर गुंतलेली असे. तरीसुद्धां वसुदेव गडावरती राहण्यासाठीं आल्यापासून बाबांनीं आपल्यासाठीं एक सवंगडीच आणला आहे असें तिला वाटूं लागलें. तिचें अंतःकरण एका नवीन उत्साहानें भरून गेलें. ती वसुदेवाशीं खूप बोले, आपलीं लहानसहान दुःखें त्याच्याजवळ येऊन जिव्हाळ्यानें सांगे, वेळप्रसंगीं भांडे आणि रुसेहि. स्त्रीत्वाचीं जीं विविध आयुधें तिच्या अंतरंगाच्या कारखान्यांत नुकतींच तयार होऊं लागलीं होतीं, त्यांचा मनमोकळा आणि निर्हेतुक उपयोग ती बहुधा प्रथम वसुदेवावरतीच करून पहात असे. जान्हवीच्या दैनिक कार्यक्रमांतील पुष्कळसें काम वसुदेवानें आपल्याकडे घेतलें आणि खालीं गांवांत जाऊन बाजारहाट करण्याची जबाबदारीहि त्यानेच सर्वस्वीं उचलली. यामुळेंहि खुद्द महंतांपेक्षां जान्हवीच्याच सहवासांत त्याचा अधिक वेळ जाई आणि तो फार चांगलाहि जाई.

शनिवारचा दिवस होता. दुपारचीं कामें आटोपून जान्हवी बाहेरच्या अंगणांत आली. एका झाडाच्या सांवलींत बसून वसुदेव महंतांच्या संग्रहांतील एक पुस्तक घेऊन चाळीत बसला होता.

" मी आतां मारुतीच्या दर्शनास जाणार आहें." जान्हवी म्हणाली.

" मग जाऊन ये कीं —" वसुदेवाचें चित्त पुस्तकांत थोडें गुंतूं लागल्यानें तो तिच्याकडे न पहातांच उत्तरला.

" काय, चित्रं बघतां वाटतं ? "

" चित्रं ? मला काय वाचतां येत नाहीं ? "

" इंग्रजी वाचतां येतं ?"

" हो !"

" अन् संस्कृत ? "

" संस्कृत नाहीं येत ! "

" मग तें पुस्तक तर संस्कृतांत आहे ! " महंतांच्या सर्व ग्रंथसंग्रहाची बाह्य माहिती जान्हवीला तोंडपाठ होती. वसुदेव जरा गोंधळून म्हणाला, " मी हें पुस्तक वाचीत नाहीं हें खरें आहे; बघतों आहें. पण तूं चित्रांचं काय म्हणालीस ? चित्रं कुठें आहेत यांत ? "

" अर्थ कळला नाहीं म्हणजे अक्षरं चित्रासारखींच नाहींत का ?" जान्हवी चटकन् उत्तरली.

वसुदेवानें पुस्तक मिटून खालीं ठेवलें आणि जान्हवीकडे पहात तो म्हणाला, " काय म्हणणं आहे तुझं ? "

" म्हटलं मारुतीच्या दर्शनाला आलांत तर कांहीं बिघडायचं नाहीं, शनिवार आहे आज—"

जरा वेळानें तीं दोघेंहि उतरणीवर असलेल्या मारुतीच्या देवळाजवळ जाऊन पोहोंचलीं. रणकालीचा सगळा डोंगर जान्हवीला निकटच्या आप्ताप्रमाणें दाट परिचयाचा होता. थोर लोकांशीं असलेला आपला स्नेह कांहीं जण मोठ्या उल्हासानें आपल्या आप्तमित्रांना दाखवतात. जान्हवीहि त्या डोंगराशी असलेली ओळख वसुदेवास वारंवार सिद्ध करून दाखवीत होती. सरळ वाट सोडून ती एकदम एखाद्या अवघड कड्यावर चढायची आणि वसुदेवाचा इशारा न ऐकतां हरिणाप्रमाणें उड्या मारीत खालीं पुढच्या बाजूला निघून जायची. वसुदेव येऊन पोहोंचण्याच्या किती तरी वेळ अगोदर, ती मारुतीसमोरच्या ओट्यावरती मोठ्या ऐटीनें त्याच्या वाटेकडे पहात बसली होती.

बरोबर आणलेली एक पानाफुलांची माळ जान्हवीनें हनुमानाच्या गळ्यांत घातली, त्याच्या जवळची एक दिवली तेल घालून पेटवली व उदबत्त्या लावून भक्तिभावानें त्यास नमस्कार केला.

वसुदेव तिच्याकडे एकाग्रतेनें पहात होता, तिच्या प्रत्येक हालचालींत आतां प्रौढपणाचा डौल आणि गंभीर भाव दिसत होता. पदर कमरेला खोंचून

पहाडावरून उड्या मारणारी जान्हवी वेगळी आणि आतां डोक्यावरून पदर घेऊन एखाद्या पुरंदरीप्रमाणें देवाला लीनतेनें नमस्कार करणारी, त्याची पूजाअर्चा करणारी ही जान्हवी वेगळी ! हें स्वरूप फार वेळ टिकणार नाहीं हें वसुदेवास ठाऊक होतें, आणि तें टिकलेंहि नाहीं. नमस्कार आटोपतांच जान्हवी विजेसारखी मागें वळली आणि रागाचा आविर्भाव करून म्हणाली, " माझ्याकडे कां पहात होतां हो ? "

" छे, तुझ्याकडे कोण पाहतंय् ! मी मारुतीकडे पहात बसलों होतों. "

" खोटं, अगदीं खोटं ! "

" तुला कसं दिसल ? तूं तर मारुतीकडे वळलेली होतीस. "

" दिसायला कशाला हवं ! तुमची नजर दिसत नव्हती तरी बोचत होती मला ! ...बरं तें राहूद्या. देवाला नमस्कार नाहीं का करायचा ? "

वसुदेव उठला आणि नमस्कार करून चौथऱ्यावर, जान्हवीच्या जवळ येऊन बसला. समोर व डोंगराच्या तळाशीं दिसणारें दृश्य फार मनोहर होतें. वर्षाकाल नुकताच संपला असल्यानें सर्वत्र गवताचें आणि झाडाझुडपां-चें हिरवें आच्छादन घातलेलें होतें. हिरव्या रेशमी वस्त्रामध्यें जरीचे धागे विणावे त्याप्रमाणें खालीं असलेले लहानसान जलप्रवाह दिसत होते. घरें आणि शेतें हीं चित्रांप्रमाणें तटस्थ आणि लहान वाटत होतीं. जान्हवी किती तरी वेळ त्या दृश्याकडे टक लावून बघत बसली होती.

वसुदेवाच्या मनांत विचार आला, ही या साऱ्या देखाव्याकडे पहात आहे, कीं त्यांतील एखाद्या विशिष्ट घराच्या किंवा गांवाच्या दिशेकडे बघत आहे? पायथ्याजवळच्या कोठल्या तरी गांवीं जान्हवीचें पूर्वीं घर होतें आणि कांहीं तरी कारणानें ती पुढें महंताकडे आली एवढा कयास त्यानें केला होता. आपलें ज्ञानाची कक्षा वाढविण्याचा त्यानें निश्चय केला. तो म्हणाला, " तुझं नांव जान्हवी कुणी ठेवलं ग ? "

" कां ? वाईट आहे वाटतं ? " जान्हवी उसळून त्याच्याकडे पहात म्हणाली.

" वाईट नाहीं. फार चांगलं आहे. पण प्रचारांतलं नाहीं. "

" बाबांनीं ठेवलं हें नांव. " जान्हवी गंभीरपणानें म्हणाली.

" पूर्वीचं नांव काय होतं ? "

" पूर्वीचीं नांवं एक सोडून दोन होतीं मला ! "

" म्हणजे काय ? "

" म्हणजे— " ती क्षणभर थांबली. सांगावें कीं न सांगावें अशा संभ्रमांत होती ती. तिनें वसुदेवाकडे जरा निरखून पाहिलें आणि नंतर निःशंकतेनें ती म्हणाली, " मी विधवा आहें ! "

" विधवा ?" अेक तीव्र वेदना सर्व शरीरांत फिरून गेल्याप्रमाणें वसुदेवाला झालें.

" होय, मी विधवा आहें, " जान्हवी संथपणानें समोरच्या क्षितिजाकडे पहात म्हणाली. तिच्यांतला तो अल्लडपणा, खेळकरपणा पार कोठल्या कोठें लोपून गेला होता. इरकली साडीचा पदर डोक्यावरून घट्ट लपेटून घेत ती पुढें म्हणाली, " माझं नशीब चांगलं म्हणून विधवा झालें मी; पण असं बोलणं वाईट असतं. असतं का हो खरंच वाईट ?"

" चांगल्यावाईटाच्या ठाम व्याख्या अद्याप जगांत कोणाला करतां आलेल्या नाहींत. खरं काय, खोटं काय हेंच खरोखर महत्त्वाचं आहे. " वसुदेव उत्तरला.

" बाबाहि असंच म्हणतात. "

तिचा संकोच कमी झाला आहे असें पाहून वसुदेवानें विचारलें, " कपाळाला कुंकू कस लावतेस मग ?"

" लग्न केव्हां झालं हें मला आठवत नाहीं. ज्यांच्याशीं झालं त्यांनाहि चांगलं बघितल्याचं आठवत नाही. सारच न कळत झालं. मग कुंकू लाव नको तर काय करूं ? "

जान्हवी वसुदेवाकडे न पाहतां स्थिर आवाजांत बोलत होती. जणूं वसुदेवाप्रमाणें रणकालीच्या डोंगराला, खाली पसरलेल्या दरीला, समोरच्या आकाशाला व सूर्याला—सर्वांनाच ती आपलें हृद्गत सांगत होती.

" मी चार वर्षांची असतांच लग्न झालं म्हणतात. ते वयानं माझ्याहून खूप मोठे होते, पहिली बायको होती व इतर नादहि पुष्कळ होते. लग्नाचं कारण म्हणजे माझ्या वडलांचा—काका म्हणायची मी त्यांना—आजार. कसल्या तरी रोगानं ते सतत आजारी असायचे. मला वडील आठवतात ते नेहमीं बिछान्यावर पडलेले, डोळे खोल गेलेले, तोंडावरचे केस खूप वाढलेले असे·

आई तर आधींच गेली होती. घरांत एक म्हातारी नातेवाईक होती. आपल्या जिवाचा भरवसा नाहीं, त्यांत घरांत कर्जबाजारीपणा घुसलेला. माझं लग्न उरकायच्या मागें लागले ते. बाभूळवाडीच्या एका वतनदाराचं कर्ज होतं काकांना. त्यानं सांगितलं, मुलगी द्या म्हणजे कर्ज सोडूं, वर थोडी रक्कमहि देऊं. काकांना मोह झाला. त्यांनीं रुकार दिला व लग्न झालं. मला बाभूळवाडीला कांहीं दिवस पाठवलं. मला त्यांचं एकच दर्शन आठवतं. डोक्यावर मोठं थोरलं पागोटं घालून आणि तोंडांत पानतंबाखू चघळीत, लाल ओठांनीं व लाल डोळ्यांनीं ते पहात होते माझ्याकडे. ते डोळे, ते तांबडे ओठ अन् ती पानतंबाखू येवढ्याच गोष्टी माझ्या डोळ्यासमोर येतात. बाकी कांहीं नाहीं. पुढें काकांची त्यांची कांहीं बोलाचाली झाली व मी पुन्हां घरीं आलें. दोन-तीन वर्षें निघून गेलीं. काकांनीं एके दिवशीं मला सांगितलं कीं आजपासून कुंकू लावूं नकोस. बाबा दिवसभर डोक्यावर पांघरूण ओढून पडले होते व घरांतली ती म्हातारी सारखी कांहींतरी बडबड करीत होती. मी फार हट्टी होतें तेव्हां. काकांचं न ऐकतां मी रोज नेहमींप्रमाणें वेणीफणी करून कुंकू लावायची. एकदां काका खूप रागावले. मी आरसा घेऊन बसलें असतां ते उठून दडादडा धांवत आले आणि माझ्या कपाळाचं कुंकू त्यांनीं आपल्या हातानं पुसून टाकलं आणि खूप मारलं मला. आरसा फेकून दिला, जवळ कुंकवाचा करंडा होता तोहि बाहेर भिरकावून दिला. मी खाणंपिणं सोडलं अन् तशीच कोपऱ्यांत पडून रडत राहिलें. म्हातारीनें परोपरीनें सांगितलं काकांनींहि धाक घातला. पण मी उठलें नाहीं कीं घोटभर पाणीहि प्यायलें नाहीं. संध्याकाळीं काका ताडकन बिछान्यांतून उठले. अंग लटलटत होतं तरी तशीच डोक्यावर टोपी ठेवली व बाहेर गेले. पांचदहा मिनिटांनीं परत घरीं आले ते. टोपी न काढतां तसेच ते माझ्याजवळ येऊन बसले. बंडीच्या खिशांतून त्यांनीं एक पुडी काढली आणि ती उघडून थरथरत्या बोटानं माझ्या कपाळाला कुंकवाचा टिळा लावला. मला एकदम त्यांनीं छातीशीं धरलें आणि ते म्हणाले, ' मी चांडाळानंच तुझं कपाळ फोडलं ग ! पण विधवा झालीस, ही त्यांत देवाची कृपा. त्यानं तुला कसाबाप्रमाणें छळलं असतं; जिवंत मारलं असतं. जा, खुशाल कुंकू लावीत जा आजपासून. कांहींहि कर,

कशीहि रहा. आपलं लग्न झालं होतं हेंसुद्धां विसरून जा. त्यांत काय पाप असेल तें देवाच्या पायाशीं धरणं धरून माझ्या माथ्यावर घेईन सगळं ! ”

वसुदेवाचें अंतःकरण भरून आलें. आनंदाचें, खेळकरपणाचें साक्षात् माहेर-घरच वाटणारा हा लहान जीव केवढ्या दुःखांच्या व यातनाच्या चरकांत पिळला गेला आहे !

“ मग महंत कधीं भेटले ? ”

“ त्या प्रसंगापासून काकांचं मन फार हळवं झालं. मला ते जीव कीं प्राण करूं लागले. जरा मी नजरेआड झालें कीं कासावीस होऊन जायचे. मीहि अष्टौप्रहर, दिवसां, रात्रीं त्यांची सेवा करीत बसायची, घरांतलं पडेल तें काम करायची. लहानपणींच मी मोठी होऊन गेलें. म्हातारी अधूनमधून दुसऱ्या आप्ताकडे जायची. अशा वेळीं स्वयंपाकपाण्यासह सारं घर मला सांभाळावं लागे. काका बिछान्यांतून पडल्या पडल्या खोल डोळ्यांनीं माझ्याकडे पहात आणि म्हणत, ‘ शाता, मी येऊं का जरा ? ’ मी सांगायची, तुम्ही उठलांत तर मी कांहींच करायची नाहीं ! अशा परिस्थितींत तीनचार वर्षें निघून गेलीं. काकांचा आजार अखेरच्या पायरीवर गेला होता. एक दिवशीं एका शेतकऱ्याच्या घरीं मी दूध पहायला गेलें होतें. तेथें खूप गर्दी दिसली झोपडीजवळ. कोणी तरी सांगितलं, महंतबाबा आले आहेत आंत. मी तशीच आंत गेलें व दूध मागूं लागलें. महंत झोंपडीत बसले होते. त्यांनीं मला जवळ येण्यास सांगितलें. मी जरा फणकाऱ्यानें म्हणालें, मला वेळ नाहीं यायला. काका आजारी आहेत. त्यांच्यासाठीं दूध हवंय् मला ! महंतांनीं कोपऱ्यांतल्या चरवींतून दूध घेतलें आणि ते मला म्हणाले, चल बघूं, मी येतों दूध घेऊन तुझ्या घरीं ! माझ्या मागोमाग महंत आलेले पाहून काका अगदीं चकित झाले. नमस्कार करण्यासाठीं ते उठण्याचा प्रयत्न करूं लागले. पण पुढें होऊन महंतांनीं त्यांना आडविलें. त्यांच्या बिछान्याजवळ बसून ते चौकशी करूं लागले. तेव्हांपासून जवळजवळ रोज महंत घरीं यायचे व काकांना कांहीं औषधपाणी द्यायचे. त्यांच्याशीं बोलायचे. काकांची खूप श्रद्धा जडली त्यांच्यावर. जिवाची तर आशा नव्हतीच. पण ‘ माझ्या मनांतलं सारं वादळ आतां शांत झालं ’ असं नेहमीं म्हणायचे ते. हेहि दिवस गेले आणि एक दिवशीं काकांचं आयुष्य संपलं. मला महंतांच्या हवालीं करून ते स्वर्गाला

गेले. तेव्हांपासून हें नवं आयुष्य सुरूं झालं. नवीन जन्मच झाला माझा, असं वाटलं मला. पहिली शांता गेली, नवी जान्हवी जन्माला आली. बाबांच्या जवळ रहाणं म्हणजे देवाजवळ राहण्यासारखं आहे. आपल्या चारी बाजूंला त्यांचे आशीर्वाद नेहमीं रक्षण करीत उभे असतात. त्यांच्या प्रेमाला मर्यादा नाहीं कुठें. खालच्या त्या जगांतल्या कोणत्याहि दुःखाला, कोणत्याहि यातनेला येथें येतां येत नाहीं घरीं होतें तेव्हांप्रमाणेंच इथंहि मी खूप काम करतें, राबतें. पण प्रत्येक गोष्ट करतांना किती हुरूप वाटतो ! मनाला मोकळेपणा तर इतका वाटतो कीं, एखादे वेळीं असं कुठं बाहेर येऊन बसलं म्हणजे वाटतं कीं—"

एकदम तिला वसुदेवाच्या अस्तित्वाची, आपण काय बोलत आहोंत याची तीव्रतेनें जाणीव झाली आणि खालीं मान घालून हंसत, तिनें आपलें तोंड दोन्ही हातांनीं झांकून घेतलें.

"काय वाटतं सांग कीं !"

"तुम्ही हंसाल, मला ठाऊक आहे !"

"नाहीं हंसणार— "

"असं वाटतं कीं...आपल्या जिवाचे पातळ, पिसासारखे हलके पापुद्रे निघत आहेत आणि ते वाऱ्यावरती उडून जाऊन भोंवतालच्या रानाशीं, आभाळतल्या ढगांशीं मिळून जात आहेत ! " जान्हवी म्हणाली, " आतां हंसा पाहूं. हंसूं दाबून ठेवलंय् हें मला माहीत आहे. "

समोर परमेश्वर येऊन त्यानें हंसायला सांगितलें असतें तरी वसुदेवाला तें जमलें नसतें. तो खरोखर चकित झाला होता. त्याला वाटलें, जिला आपण लहान अल्लड मुलगी समजतों तिचें अंतःकरण किती विकसित झालेलं आहे, मोठ्या प्रतिभावंतांनाहि दुर्मिळ असलेले अनुभव तिला किती सहजतेनें येत आहेत !

तीं दोघें परत जायला निघालीं तेव्हां सूर्य दिसेनासा झाला होता. अडगळींत जाऊन पडणाऱ्या चेंडूप्रमाणें, पूर्वेकडे असलेल्या छोट्या टेकड्यांच्या रांगेंत तो मघांच अदृश्य होऊन गेला होता. मंदिराच्या पारावर वसुदेव कांहीं वेळ उभा राहिला आणि समोरच्या देखाव्याचें त्यानें तन्मयतेनें अवलोकन केलें. मावळतीच्या आकाशांतील विविध रंगांचे कल्लोळ पाहून तो

स्तिमित झाला. समोरील टेकड्यांच्या पार्श्वभूमीवर केशरी, निळ्या व लाल रंगाच्या प्रचंड कनाती उभ्या केल्या आहेत आणि सूर्य आंत जातांच, आतांपर्यंत उघडा असलेला पश्चिमेचा डेरा दारावरील मखमली पडदे सोडून आतां बंद करून टाकला आहे असें त्यास वाटलें. सृष्टींतील विविध वस्तूंवर पडलेले प्रकाशाचे पदर आकाशांतील कोणी अदृश्य देवता भराभर ओढून घेत होत्या. पुरता प्रकाशहि नाही आणि पुरता अंधारहि नाहीं अशा अवस्थेंतील तें सृष्टीचें स्वरूप, नाट्य आटोपल्यानंतर अंगावरचीं वस्त्रें व तोंडावरचा रंग उतरविणाऱ्या सुंदर नटीप्रमाणें वेगळें आणि विस्कळित असूनहि आकर्षक दिसत होतें. वसुदेव काहीं वेळानें मागें वळला, तेव्हां जान्हवी वरती असलेल्या एका खडकावर उभी राहून आपल्याकडे निरखून पहात आहे असें त्यास आढळलें.

"काय दिसत होतं एवढं समोर?" वसुदेव जवळ आल्यावर जान्हवी उद्‌गारली.

"आकाश!"

"आकाशाला काय पहायचं?"

"मग कोणाला पहायचं?" वसुदेवानें विचारलें.

"मला!" जान्हवी म्हणाली व हंसूं लागली.

"तुला तर आल्यापासून पाहतोंच आहे कीं!"

जान्हवी यावर कांहीं उत्तरली नाहीं. ती एकदम गंभीर झाली आणि खालीं मान घालून चालूं लागली. एखाद्या जलाशयावर कांहीं निमित्तानें उठलेलीं वलयें क्षणभरांत विरून जावींत आणि अचल गांभीर्याच्या आवरणांत त्या पाण्यानें पुन्हां स्वतःस गुरफटून घ्यावें त्याप्रमाणें जान्हवीच्या मुखावरील खेळ-करपणाची भावना मावळून गेली. कोठल्या तरी कठोर विचाराची अकस्मात् ठेंच लागल्यामुळें ती किंचित् कावरीबावरी झाली.

"एक गोष्ट तुम्हांला विचारूं का?" ती जरा वेळानें म्हणाली.

"विचार कीं! त्याला परवानगी कशाला?"

"मी–मी विधवा आहें ना?"

"बरं, आहेस समज—"

"मग–मी असं वागणं हें चांगलं का?"

" कसं ?"

" इतक्या मोकळेपणानं, एकाद्या लहान मुलीसारखं !"

" तूं विधवा असलीस तरी लहान मुलगीहि आहेसच कीं ! असंच वागायला हवं तूं."

" सध्याचं ठीक आहे, पण पुढें ?"

" पुढें केव्हा ?"

" मी अशी लहान थोडीच राहणार आहें ? कांहीं दिवसांनीं मी मोठी होईन—"

" मोठी होशील तेव्हां कसं वागावं हें तुलाच कळायला लागेल. त्याची आतांपासून चिंता कशाला ?"

" एखादेवेळीं भीति वाटते—"

" महंतांची मुलगी अशी भिते वाटतं?"

" इतर कशाला किंवा कोणाला भीत नाहीं !"

" मग ?"

" एखादेवेळीं त्यांचीच भीति वाटते !"

" म्हणजे काय ?" वसुदेव कांहींसा चकित होऊन उद्गारला.

" म्हणजे कांहींच नाहीं !" जान्हवी पूर्ववत् थोड्याशा अवखळपणानें म्हणाली. " जान्हवी नांवाची एक खुळी मुलगी आहे. ती काय बडबडते हें तिचं तिलाच समजत नाहीं !"

" महंत आले म्हणजे त्यांना सांगतों कीं जान्हवीला केव्हां केव्हां तुमची भीतीहि वाटते. खूप हंसतील ते!"

" सांगा, पण एक लक्षांत ठेवा."

" काय ?"

" तळ्याच्या पलीकडे तो उंच कडा आहे ना ?"

" हो—"

" त्या कड्यावरून मी खाली उडी टाकीन. अगदीं माझ्या गळ्याची, देवाची शपथ !"

● ● ●

# ५

"मीहि पूर्वी तुझ्याच पंथांतला होतों. राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं तळहातावर शीर घेऊन भर तारुण्यांत घराबाहेर पडलों होतों." महंत म्हणाले.

महंतांच्या पूर्वजीवनावर पडलेला रहस्यमयतेचा विशाल पडदा इतक्या सुलभतेनें आणि सहजतेनें बाजूला सरकेल असें वसुदेवास वाटलें नव्हतें. न घडणारी गोष्ट आज घडून येत होती.

त्या दिवशीं महंत दुपारींच घरीं आले. नेहमींप्रमाणें ते संध्याकाळीं आपल्या नित्योद्योगासाठीं बाहेर गेले नाहींत.

"आज कंटाळा आला आहे ! येतोस रणकालीपर्यंत ?" ते वसुदेवाला म्हणाले.

वसुदेवाला अत्यंत आनंद वाटला. महंत त्याच्याशीं मोकळेपणानें बोलत, त्याची थट्टामस्करीहि करीत. आपल्या मठांतील त्याचें जीवन जास्तींत जास्त सुखावह व्हावें, त्यांत संकोचाला अथवा परकेपणाला अवसर राहूं नये याची ते खबरदारी घेत होते. तरीहि आपण महंतांच्या जवळ जाऊं शकत नाहीं, त्यांच्यामध्यें व आपल्यामध्यें एक अनुल्लंघनीय दरी आहे असें वसुदेवास वाटल्याविना रहात नव्हतें. पुळणीवर जाऊन समुद्राच्या वाटा हातापायावर घेतल्या, तरी समुद्राची गहनता व असीमता आपल्या आटोक्याबाहेर आहे ही जाणीव थोडीच नाहींशी होते ? महंतांच्या सहवासांत त्याची चित्तवृत्ति अशीच असायची आणि म्हणून महंतांनीं त्याला आपल्याबरोबर फिरायला येण्याचें आमंत्रण दिलें तेव्हां त्याचें अंतःकरण अपरिमित उल्हासानें भरून गेलें. महंतांच्या बरोबरच नव्हे, तर त्यांच्या जवळहि जाण्याची संधी आज आपल्याला अखेर मिळत आहे असें त्यास वाटलें.

ती संध्याकाळ त्याच्या आयुष्यांत क्रांतिकारक ठरली. ज्या जगांतून तो आला होता, त्या जगाचा कायमचा निरोप घेण्याचा निर्धार त्यानें त्या सायंकाळीं केला. त्याच्या जीवनाचा प्रवाह पूर्वीच्या पात्राचा त्याग करून नवीन दिशेनें वाहूं लागला.

रणकालीच्या कड्यावर जाऊन त्या दोघांनीं देवीचें दर्शन घेतलें आणि

ते बाहेर एका पायरीवर येऊन बसले. रणकालीच्या डोंगरावरील तें जवळजवळ अत्युच्च स्थान होतें. देवळाच्या मागें असलेला सुमारें पाऊणशें फूट उंचीचा सुळका त्यांच्या पाठीशीं होता, समोर डोंगरावरील विस्तीर्ण पठार होतें आणि त्या पठाराच्या दोन्ही बाजूला हजारों फूट खोल असलेल्या आणि झाडाझुडुपांच्या गर्द आच्छादनामुळें हिरव्यागार दिसणाऱ्या दऱ्या होत्या.

" तुम्हीं देवीला नमस्कार केलांत, तुमचा मूर्तीवर विश्वास आहे ? " वसुदेवानें चांचरत विचारलें.

" प्रत्येक गोष्ट आपण चिकित्सेनं करतों असं थोडंच आहे ? " महंत स्मित करून उत्तरले, " संवय, परंपरा या माणसाच्या जीवनांतील फार मोठ्या शक्ति आहेत ! मूर्ति पाहिली कीं नमस्कार करायचा ही शतकानुशतकांची संवय माझ्याहि मनावरती रोवून बसली आहे ! "

क्षणभर थांबून महंत म्हणाले, " तुझा आहे का विश्वास मूर्तीवर ?"

" माझा एकाच मूर्तीवर विश्वास आहे ! "

" कोणत्या ? "

" भारतमातेच्या ! " वसुदेव उत्तरला.

" कुठें आहे हें भारतमातेच्या मूर्तीचं देऊळ ? "

" प्रत्येक भारतीयाच्या अंतःकरणांत आहे !"

वसुदेवाचीं हीं निश्चित स्वरूपाचीं उत्तरें ऐकून महंत कांहींसे अधिक गंभीर झाले.

समोरच्या दिशेकडे हात दाखवीत ते म्हणाले, " इथें पायथ्याशीं झोपड्यांतून, खोपट्यांतून जे लोक राहतात त्यांच्या अंतःकरणांत ही मूर्ति आहे का ?"

" नाहीं, नसावी. "

" तुझ्या अंतःकरणांतली मूर्ति तरी कशी आहे ! कॅलेंडरांवर भारतमातेचें चित्र काढतात त्याप्रमाणें ? "

" तुम्ही माझी चेष्टा करीत आहांत ! " वसुदेव गोरामोरा होऊन उत्तरला. " पण तशी मूर्ति असायला तरी काय हरकत आहे ? लोक ज्या देवदेवतांची पूजाअर्चा करतात त्यांच्या मूर्तीहि शिल्पकारांच्या, चित्रकारांच्या अथवा कवींच्या कल्पनेंतूनच अवतीर्ण झाल्या आहेत. "

" देवाची मूर्ति केल्यामुळें देवाचं कांहींहि नुकसान होण्याचा संभव नाहीं."

महंत म्हणाले, " परंतु भारतमातेला सुंदर स्त्रीचं मूर्त स्वरूप देण्यानं दैवत आणि भक्त या दोघांचंहि नुकसान होतं असं मला वाटतं ! "

" माझ्या ध्यानांत येत नाही. " वसुदेव उद्गारला.

" ईश्वर हा अमूर्त आहे. त्या अमूर्ताची कल्पना ज्यांना करतां येत नाहीं, त्यांनीं त्यास मूर्त स्वरूप देऊन त्याची उपासना करावी हें साहजिक आहे, पण भारत देश हा कांहीं अमूर्त नाही ! दगडधोंड्यांनीं, नद्यांनीं व पर्वतांनी, माणसांनीं व पशूंनी भरलेला हा भूप्रदेश प्रत्यक्ष आहे, मूर्त आहे. त्याच्या या प्रतिमा कशासाठी ? "

" पण त्यांत वाईट काय आहे ? दगडधोंड्यापेक्षां किंवा नदीपर्वतांपेक्षां त्यांच्या सुंदर प्रतीकावर श्रद्धा ठेवणं मला जास्त सोपं वाटणार नाहीं का? " वसुदेवानें विचारलें.

" माणसाची बुद्धिमत्ता भ्रष्ट व पंगू करण्याकडे प्रतीकांचा कल असतो, " महंत उत्तरले. " संपूर्ण सत्याचं आकलन ज्यांना होत नाही ते प्रतीकांची पूजा करतात; परंतु प्रतीकांची पूजाअर्चा वाढूं लागली म्हणजे संपूर्ण सत्य हें प्रतीकांतच आहे असा समज उत्पन्न होतो. हा समज फार घातक आहे. भारतमाता म्हटल्यावर तुझ्यासारख्या श्रद्धावंताच्या नजरेसमोर, शुभ्र संगमरवरांतून सिद्ध केलेली लावण्यवान् स्त्रीची एक आकृति उभी रहावी ही गोष्ट तुझ्या हिताची नाहीं, अन् भारतमातेच्या तर अहिताचीच आहे ! ही पर्वतपठारं, या नद्या, हीं सरोवरं, मुरमानें भरलेले अफाट माळ, येथील शेती, येथील शेतकरी, दारिद्र्यानं आणि अज्ञानानं शरणागत झालेली येथील हीनदीन मानवता—या साऱ्या गोष्टी तुझ्या नजरेसमोर आल्या पाहिजेत ! तरच या देशाची सेवा तुझ्या हातून खरोखरी होऊं शकेल ! गाईच्या शरीरांत तेहतीस कोटी देवांची वस्ती आहे असं मानणाऱ्या अंध भाविकांत आणि भारतमाता म्हणजे निरामय मांगल्याचं, पावित्र्याचं आणि आनंदाचं निधान असं मानणाऱ्या तुझ्यासारख्या भाववश देशसेवकांत तत्वतः कोणता फरक आहे ? "

महंतांनीं व्यक्त केलेला हा विचार वसुदेवाला नवीन वाटला. स्वदेश म्हणजे केवळ मांगल्य आणि पावित्र्य नव्हे. स्वातंत्र्य म्हणजे केवळ स्वर्गाची साधना नव्हे...

स्वदेश आणि स्वातंत्र्य या दोहींनाहि याहून पुष्कळ अधिक अर्थ आहे; आणि तो सारा अर्थ इतका सुंदर नाहीं.

ज्या श्रद्धेच्या आसनावर त्याची बुद्धि स्थिर झाली होती तें आसनच डळमळूं लागलें आहे असें त्यास वाटूं लागलें.

परंतु या विचाराबरोबरच त्याच्या मनांत दुसराहि एक विचार आला. महंताचे हे शब्द म्हणजे सर्वसंगपरित्याग करून केवळ परमार्थाच्या मार्गे लागलेल्या साधूचे शब्द नव्हते. त्यांत आत्मप्रत्ययाचा जिव्हाळा भरलेला होता. त्याला अनिवार कुतूहल वाटूं लागलें.

" तुम्ही या मार्गाला कधीं गेलां होतां का ? " कांहींशा संकोचानें त्यानें विचारलें.

महंत क्षणभर कांहींच उत्तरले नाहींत. जुन्या, निकामी झालेल्या वस्तु कपाटांतून शोधून काढायला वेळ लागावा, त्याप्रमाणें आपल्या गतजीवनाचे धागे शोधायला त्यांना जणूं वेळ लागत होता, कष्ट पडत होते.

" मीहि पूर्वी तुझ्याच पंथांतला होतों. " महंत म्हणाले, " राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं सर्वस्वाचा होम करण्याच्या प्रतिज्ञेनें मीहि तुझ्यासारखाच घराबाहेर पडलों होतों. "

महंतहि आपल्याच पंथानें गेलेले ! आज ते वेदांती व विरक्त होऊन यतिजीवनाचा मार्ग चोखाळीत असले तरी तारुण्याच्या पहिल्या अमदानींत ते आपल्याच वाटेनें गेलेले आहेत ! अज्ञेयाच्या शोधासाठी आज डोंगरदऱ्या आक्रमणारीं त्यांचीं पावलें स्वातंत्र्यमार्गावरील जळत्या निखाऱ्यावरून चालून गेलीं आहेत ! वसुदेवाला महंतांविषयीं वाटणारा आदरभाव दुणावला. त्या आदरांतील आपुलकीची, हार्दिकपणाची भावना अधिक दृढ झाली. महंतांच्या आपण अधिक जवळ जात आहोंत असें त्यास वाटलें.

" केव्हांची ही गोष्ट ? " त्यानें विचारलें.

" वीसपंचवीस वर्षं होऊन गेलीं असतील ! वासुदेव बळवंतांची परंपरा जागृत ठेवली पाहिजे असा कांहीं तरुणांनीं संकल्प सोडला होता ! या तरुणांत मीहि एक होतों. "

" तुम्ही सारेजण सुशिक्षितांपैकींच होतां का ? "

" आम्ही सर्व सुशिक्षित—म्हणजे शाळाकॉलेजांतील विद्यार्थीच होतों.

सुशिक्षित व पांढरपेशा लोकांतच तेव्हां ही स्वातंत्र्याची आकांक्षा उत्पन्न झालेली होती. अशिक्षित व मागासलेल्या लोकांना स्वातंत्र्याची कल्पनाहि नव्हती व आवश्यकताहि नव्हती. ब्रिटिशांनीं देशाला दास्यांत टाकलं होतं; परंतु व्यक्तीला मात्र आतांपर्यंत कधींहि मिळालं नाहीं असं स्वातंत्र्य आणि सुख त्यांच्या राज्यपद्धतीनं दिलेलं होतं. कांहीं सुशिक्षितांना राष्ट्रीयत्वाची व स्वातंत्र्याची जाणीव झाली तीसुद्धां इंग्रजांमुळेंच. इंग्रज केवळ तरवार अथवा तराजू घेऊन येथें आले नाहींत; त्यांनीं आपली भाषा, आपलं वाङ्मय आणि जीवनाविषयीच्या आपल्या वेगळ्या निष्ठाहि आपल्याबरोबर या देशांत आणल्या. इंग्रजी शिकलेल्यांना प्रथम त्यांचं आकलन व्हावं हें स्वाभाविक होतं. इंग्रजी ज्ञानांतच इंग्रजांचं मरण होतं. पुराणांतील अनेक असुरांप्रमाणें आपल्या मृत्यूचं वर्म अंगावर घेऊनच त्यांनीं भारतांत प्रवेश केला! आमचीं स्फूर्तिस्थानं इंग्रजी साहित्यांत व त्यांतील प्रेरणांतच होतीं. डफरीनच्या कारकीर्दींत राणीच्या राज्याचं पन्नासावं वर्ष मोठ्या थाटामाटानं साजरं झालं. याच काळांत, महाराष्ट्र आणि बंगाल या प्रांतांत क्रांतिकारकांनीं जे कट केले त्यांत मी ओढला गेलों—

"नेमकं काय करायचं होतं तुम्हांला?" वसुदेवानें भीत भीत विचारलें. महंतांच्या बोलण्यानें तो भारावून गेला होता. त्यांच्या आवाजांत सामर्थ्य आणि मार्दव यांचा असामान्य संयोग झालेला होता. त्यांच्या त्या तेजस्वी शब्दांच्या प्रवाहांत, मध्येंच आपले क्षीण शब्द घालणें म्हणजे अग्नीच्या सळसळणाऱ्या ज्वालेंत हात घालण्यासारखें होतें.

"जें तुम्हीं केलं तेंच आम्हांला करायचं होतं!" महंत किंचित् हंसून उत्तरले, "पण तें सारं आतां इतिहासांत जमा झालं आहे. तपशीलानं तपशील वाढवायची माझी इच्छा नाहीं! माझ्या पूर्वजीवनाचाच नव्हे तर माझ्या नांवागांवाचाहि त्याग करून मी या डोंगरावर रहात आहें. ते बंद दरवाजे पुन्हां उघडावे असं मला वाटत नाहीं! इतकंच सांगतों कीं, आमचे प्रयत्न अयशस्वी झाले आणि मी कांहीं सहकाऱ्यांबरोबर पांच वर्षं तुरुंगांत गेलों!"

"पण मग तुम्ही असे विजनवासी होऊन कां राहिलांत?" वसुदेवानें कांहींशा बेभानपणें विचारलें, "अद्यापहि आपल्या देशाला स्वतंत्रता प्राप्त

झाली नाहीं ! अद्यापहि या भूमीच्या कपाळावर पारतंत्र्याचा शाप आहे–स्वतंत्रतेचा तो स्वर्ग अद्यापहि हाताला लागलेला नाहीं..."

"पारतंत्र्याचा शाप ! स्वातंत्र्याचा स्वर्ग ! " महंत उद्गारले, "वसुदेव, या सुंदर शब्दांच्या मोहजालांतून मी आतां मुक्त झालों आहें. तुझ्याप्रमाणें यौवनाच्या भरांत होतों तेव्हां मीहि या शब्दजालांत गुरफटून गेलों होतों. शब्दांतून आम्ही जीवनाकडे जात होतों. शब्दांवर आमच्या श्रद्धा होत्या. केवळ शाब्दिक श्रद्धांसाठीं आम्ही प्राण अर्पायला सिद्ध होतों. विसापूरच्या तुरुंगांत एक विक्षिप्त व अरेरावी गोरा अधिकारी होता. राजकीय कैद्यांवर त्याचा विशेष कटाक्ष. सुचेल त्या नवीन मार्गांनीं आम्हांला छळण्यांत त्याला कृतार्थता वाटायची ! एकदां तो आमच्या कोठडीशीं आला आणि सहज म्हणाला, 'आम्ही तुम्हां लोकांना माणसासारखं वागवतों हा आमचा भलेपणा नाहीं का ? '

'तुम्हो आम्हांला माणसासारखं वागवतां हें खोटं आहे. पण तें खरं असतं तरी त्यांत विशेष भलेपणा नाहीं. जीं माणसं असतील त्यांनीं माणसाशीं माणसासारखंच वागलं पाहिजे.' आमच्यापैकीं एकजण उत्तरला.

'पण माणसामाणसांतहि भेद असतात. तुम्ही ब्राह्मण आहांत, हा वॉर्डर महार आहे. तुरुंगाच्या बाहेर तुम्ही त्याला सन्मानानं वागवलं असतं का ?' तो गोरा अधिकारी म्हणाला.

'हे हजारों वर्षांचे संस्कार आहेत. पण ते वाईट आहेत हें आम्हांलाहि मान्य आहे.' कोणीतरी उद्गारला.

'माझ्यावरहि असेच शेंकडों वर्षांचे संस्कार आहेत. ते वाईट आहेत असं आमच्यापैकींहि कित्येकांचं मत आहे. पण ते आहेत याला इलाज नाहीं. माझ्या संस्कारांना सत्याचा तरी आधार आहे. तुम्ही गुलाम आहांत हें मला उघड दिसतं आहे'—तो अधिकारी म्हणाला.

'नाहीं, आम्ही गुलाम नाहीं !' आम्ही सर्वजण ओरडलों. 'आम्ही स्वतंत्र आहोंत !'

'ठीक आहे' त्या अधिकाऱ्यानें जातां जातां उद्गार काढले. कांहींतरी मौजेची कल्पना डोक्यांत आल्याचें त्याच्या चर्येवर दिसत होतें.

"जरा वेळानें, कागदाचे कांहीं कपटे घेऊन वॉर्डर आमच्याकडे आला.

प्रत्येक कागदावर ‘ मी गुलाम आहें ’ असे शब्द खरडलेले होते. आमच्या-जवळ कागद देऊन तो म्हणाला, ‘ प्रत्येकाची सही हवी आहे या कागदावर. सही मिळेपर्यंत जेवण बंद—’

“ त्या दिवशीं कोणींच सही केली नाहीं. दुसऱ्या दिवशीं कित्येकांनीं केल्या. राहिलेल्यांनीं तिसऱ्या, चवथ्या दिवशीं केल्या. मीं मात्र प्राण गेला तरी सही करायची नाहीं असा निर्धार केला होता. शेवटीं खरोखरीच प्राण जाण्याची वेळ आली. सहा दिवस अन्नाच्या कणाशिवाय काढले. सातव्या दिवशीं त्या गोऱ्या अधिकाऱ्याचं मन बदललं. त्यानें मला अन्न द्यायला परवानगी दिली. माझ्या खांद्यावर हात ठेवून तो म्हणाला, फार निष्ठावंत माणूस आहेस तूं ! अशीं बरीच माणसं या देशांत निपजलीं तर, खरोखरच आम्हांला सत्ता सोडून निघून जावं लागेल—”

“ खरंच ! ” वसुदेव उद्‌गारला. त्याचें अंतःकरण भरून आलें होतें. “ तुमची निष्ठा खरोखरच अपूर्व होती ! ”

“ पण ती कसली निष्ठा ? ” महंत म्हणाले, “ कशावरची निष्ठा ? शब्दांवरची, कल्पनेवरची निष्ठा ! मी गुलाम आहें असं एका व्यक्तीनं म्हटल्यामुळें वा न म्हटल्यामुळें देशाचा कोणताहि प्रश्न सुटत नव्हता. शब्द जीवनाला आवश्यक असतात, पण शब्द म्हणजे जीवन नव्हे किंवा त्याचा आधारहि नव्हे ! ”

“ मग काय, स्वातंत्र्य-पारतंत्र्य या गोष्टी खऱ्या नव्हत ? शेंकडों वीरांनीं स्वातंत्र्यासाठीं आपल्या जीवनाची आहुति दिली ती काय उगाच ? केवळ शब्दांसाठीं ? ”

“ शब्दांची प्रेरणा त्याना होती यांत शंका नाहीं--निदान आम्हांला तरी होती. आम्ही शब्दांपलीकडे काय जाणत होतों ? अनिश्चित आकार असलेल्या ढगाप्रमाणें हें स्वातंत्र्य होतं. “ ज्यांनीं त्यासाठीं प्राणाहुति दिली त्यांच्या त्यागाचं मोल मी कमी समजत नाहीं. मीहि त्यांच्यांतलाच होतों. पण बाहेर आल्यावर, जगांत बैरागी होऊन फिरूं लागल्यावर, पूर्वी न पाहिलेलं जग मला दिसूं लागलं. मला वाटूं लागलं कीं सर्वांचं कांहीं तरी चुकत आहे—”

" हें जग—आपल्याला नवीन दिसलेलं हें जग कां निर्माण झालं ? कोणी निर्माण केलं ? पारतंत्र्यानंच ना ? "

" खरं नाहीं तें—" महंत शांतपणें उत्तरले, " रस्त्यावर फिरणारे वैदू कोणत्याहि रोगाची चिकित्सा स्वत:ला ठाऊक असलेल्या ठराविक शब्दांनीं करतात. आणि सर्व रोगांवर ठराविक औषधंच सांगतात—तसं आहे हें ! "

वसुदेवाचें मस्तक तापूं लागलें. आरामखुर्चीवर बसून एखाद्या माणसानें त्याच्या स्वातंत्र्याच्या श्रद्धेवर असा आघात केला असता तर खवळून जाऊन त्यानें त्याचा अपमानच केला असता. पण आताचे शब्द महंतांच्या मुखांतून, स्वातंत्र्याच्या संग्रामांत स्वत:चें सर्वस्व जाळून बसलेल्या, त्यासाठीं अनेक हालअपेष्टा भोगलेल्या महंतांच्या तोंडांतून येत होते. महंतांबद्दल त्याला वाटणारी श्रद्धा एवढी गाढ होती कीं त्यांच्यावर रागावणें किंवा त्यांना कमी-अधिक बोलणें त्याला सर्वथा अशक्य होतें. तो स्तब्धपणानें पुढें ऐकूं लागला.

" वसुदेव, माझ्याबरोबर एक दिवस या मुलखांत चल. केवढ्या अफाट, अनंत दुःखाचे डोह घराघरांतून, झोंपड्याझोंपड्यांतून सांचून राहिले आहेत हें तुला दिसून येईल. भयानक दारिद्र्यानं पीडलेला, विविध रोगामहारोगांनीं पोखरलेला आणि अज्ञानाचे पाश गळ्याला लागलेला हा उपाशीतापाशी, वस्त्रहीन देश आमच्या नेत्यांनीं कधीं पाहिला आहे का ? "

" देशाचं पारतंत्र्यच याला कारणीभूत आहे ! अज्ञान, दारिद्र्य, विषमता हीं पारतंत्र्याचींच विषारी फळं आहेत. " वसुदेव आवेगानें म्हणाला.

" या लोकांपुढें जाऊन तूं स्वातंत्र्य–पारतंत्र्य या शब्दांचा उच्चार कर–" महंत आपल्या बोलण्यांत स्वत:च मग्न झाल्याप्रमाणें होऊन म्हणाले, " कोठल्या भाषेंतील हे शब्द आहेत हेंहि त्यांना कळणार नाहीं. त्यांना हे शब्दहि ठाऊक नाहीत आणि त्या शब्दांतून व्यक्त होणाऱ्या कल्पनांचंहि त्यांना आकलन नाहीं. राज्य कुणाचं आहे या संबंधीं त्यांची माहिती अगदीं अस्पष्ट आहे. तें कसं चालतं आणि आपला व त्याचा संबंध कसा येतो याची तर त्यांना मुळींच जाणीव नाहीं. त्यांची ही बौद्धिक, शारीरिक आणि आर्थिक अवस्था काय गेल्या दीडशें वर्षांमध्यें निर्माण झाली आहे ? पशु आणि माणूस ह्यांच्या सरहद्दीवरील एका अवस्थेंत ते जीवन लोटीत असतात. हें काय सारं पश्चिमेकडून आलं आहे ! कुठल्याहि खेड्यांत जाऊन

तेथील महारवाडे, चांभारवाडे पहा. तळाशीं असलेल्या समाजाचाहि हा आणखी खालचा तळ. किती अपमान, किती यातना, किती दारिद्र्य भरलं आहे तिथें ! हे महारवाडे काय ब्रिटिशांनीं आणले ? थोडंसं शिक्षण घेतलेला एक महार मला म्हणाला, साहेब या देशांतून निघून गेले तर आम्हीहि त्यांच्याबरोबर त्यांची नोकरीचाकरी करीत जाऊं ! हा एका वर्गाचा अन्य वर्गावरील विश्वास ! ज्या राजनीतीला आपण शाप देतों तिनं ज्ञानाच्या आणि स्वाभिमानाच्या लाटा तरी या लोकांपर्यंत पोहोंचविण्याचं श्रेय मिळविलं आहे ! "

" मग याला उपाय काय ? असंच पारतंत्र्यांत पिचत पडून राहायचं ? इंग्रजांच्या हातून आम्हां सर्वांचा उद्धार होण्याची वाट पहात बसायचं ? "

" निष्क्रियता ही कधींच हितकारक होत नाहीं. " महंत म्हणाले, " या लोकांना जो जाणूं शकेल तोच देशाला गुलामगिरींतून मुक्त करील. स्वातंत्र्याचा व राज्याचा अर्थ त्यांच्या भाषेंत जो त्यांना समजावून सांगेल, तिरस्कारानं दूर उभं न रहतां जो स्नेहानं त्यांच्या जवळ येईल, त्यांच्या सुखदु:खांची जिव्हाळ्यानं विचारपूस करील, त्यांना समजणारी भाषा बोलेल, त्यांना विश्वास वाटेल असा वेष परिधान करील तोच त्यांचा, म्हणजेच साऱ्या भारताचा नेता होईल ! या लुळ्या पांगळ्या मानवतेला जो पायावर उभा करून स्वत:बरोबर चालवूं शकेल, तोच स्वातंत्र्याचा दरवाजा उघडूं शकेल. आणि अशा रीतीनं जें स्वातंत्र्य मिळेल तेंच खरोखर देशाचं कल्याण करील—"

" पण महंत, आपल्यासारखे जे नेते या बाबतींत कांहीं प्रयत्न करतात त्यांत राजकारणाला वाव कुठें आहे ! "

" मी नेता नाहीं, कधीं नव्हतोंहि. " महंत किंचित् हंसून उत्तरले. " नेता असा कफनी पेहरून डोंगरावर रहात नाहीं. स्वत:चं समाधान शोधणारा मी एक बैरागी आहें. मी जाणून बुजून वेगळा मार्ग निवडला आहे. परंतु अशा प्रयत्नांत राजकारणाला वाव असायचीहि जरूरी नाहीं. देशाचं स्वातंत्र्य ही माझी प्रेरणा नाहीं. माझी प्रेरणा वैदिक तत्त्वज्ञानांत आहे. इंग्लंड–अमेरिकेसारख्या एखाद्या स्वतंत्र देशांत मला नेऊन टाकलं तरी तेथेंहि मी आज करतों तेंच करीत राहीन. द्वैतांहून अद्वैताकडे प्रवास करण्याचा माझा यत्न

आहे. राजकारणांत विरोध आहे, विरोधांत द्वेष आहे. आणि द्वेष हा अद्वैत तत्वाचा अंतक वैरी आहे. 'ईशावास्यम् इदं सर्वम् यत् किंच जगत्याम् जगत्' या श्रद्धेची उपासना मी करीत आहें. माझ्या आत्म्याच्या वर्तुळाचं केन्द्र या शरीरांत आहे पण त्याची कक्षा मात्र साऱ्या विश्वाला व्यापून बसलेली आहे. मी जेव्हां अल्पस्वल्प सेवा करतों, तेव्हां ईश्वरी तत्वाचा एक अंश तशाच दुसऱ्या एका अंशाची सेवा करीत असतो. मला सेवा करण्याची संधि आहे, त्यांना सेवा करून घेण्याचा अधिकार आहे. येथें अहंकाराला वाव नाहीं, नेतृत्वाची अपेक्षा नाहीं आणि राजकारणाला प्रवेश नाहीं."

महंतांच्या गौर, ताम्रवर्ण चेहऱ्यावर हे शब्द उच्चारतांना एका अद्भुत तेजाच्या लहरी हेलावत होत्या. किंचित् चढत्या आणि भरदार आवाजांत उच्चारलेले शब्द कोठल्या तरी अपार्थिव अधिकाराचीं वस्त्रें परिधान करून बाहेर पडत आहेत असें वसुदेवाला वाटलें. त्या दैदीप्यमान दर्शनानें तो क्षणमात्र भारावून गेला होता, पण त्याच्या विवेक-शक्तीनें त्या मोहावस्थेंतून त्याला बाहेर काढलें. तो संकोचानें, अश्रद्धपणानें आपण कांहीं अपराध करीत आहोंत अशा लाजऱ्या आविर्भावानें म्हणाला, "पण हें सारं फार जुनं, अगदीं पूर्वकालीन नाहीं का? हें तत्त्वज्ञान जेव्हां सांगण्यांत आलं तो काळ उलटून हजारों वर्षें होऊन गेलीं आहेत. जग सर्वतोपरि बदललं आहे. सामाजिक जीवन फार विशाल, विस्तृत झालं आहे. या नव्या परिस्थितीच्या दृष्टीनें त्या तत्त्वज्ञानाचा कांहीं व्यावहारिक उपयोग आहे का?"

"काल बदलला म्हणून आकाश बदललं आहे काय? ज्या सूर्याला वेद-कालीन ऋषींनीं अर्घ्य दिलं तोच सूर्य आज तुम्हां आम्हांवर तळपत आहे. आकाशतत्त्वाप्रमाणें हें तत्त्वज्ञानहि निरंतर आहे. नाहीं, वसुदेव, हें तत्त्वज्ञान जगाच्या अथवा कालाच्या मागें नाहीं. मानव संस्कृतीच्या पहिल्या उषः-कालीं, स्फटिकासारखे जलप्रवाह असलेल्या नद्यांच्या किनाऱ्यावर आणि 'पूर्वे अर्धे रजसो अप्त्यस्य गवाम् जनिमी अकृत प्रकेतुम' अशा थाटांत क्षितिजावर प्रगटलेल्या प्रकाशासमोर वैदिक ऋषींना जें सत्य ज्ञान स्फुरलं तें आकाशाइतकंच सर्वकालीन आणि अक्षय आहे. सर्व युगांच्या पुढें जाऊन तें स्थिर झालेलं आहे हें सत्य त्यांना प्रयोगशाळेंत सांपडलं नाहीं. अंतर्मुख होऊन ईश्वरासमोर उभे राहिल्यावर ईश्वराचे आशी र्दिच या ज्ञानाच्या

रूपानें त्यांच्या मस्तकावर पडले आहेत. शास्त्रीय शोध कितीहि लागोत, मानवी जीवनाची समस्या ते उकलूं शकत नाहींत. शक्यतेच्या कोटींतील सारे शोध लागल्यावर, कल्पनेला संभवनीय वाटतें तें सारें ऐहिक सौख्य पृथ्वीवरती निर्माण केल्यावर, ज्ञानाची विज्ञानाची सर्व प्रगति सिद्ध झाल्यावर, त्या प्रगत सुखी मानवासमोर जीवनाचा अर्थ काय, आदिकारणाचें स्वरूप कोणतें, जें अस्तित्वांत आलें तें कोणत्या हेतूनें, वगैरे प्रश्न पूर्वींच्याच स्वरूपांत शिल्लक रहातील. त्या चिरंतन प्रश्नांची चिरंतन उत्तरं भारतीय ऋषीनीं देऊन ठेविलीं आहेत. दीर्घ प्रवास करून जग पुन्हां त्या प्रश्नांसमोर येऊन उभं रहाणार आहे. आम्हीं दिलेलीं उत्तरंच त्यांना त्या वेळीं शिरोधार्य मानावीं लागतील. "

वसुदेवाचें मन भांबावून जाऊं लागलें. महंतांचे शब्द त्याच्या विचारशक्तीवर स्वामित्व गाजवूं लागले होते. आपल्या सुवर्ण शृंखला आवळून तिला बंदीवान करीत होते. परंतु तिची धडपड अद्याप संपली नव्हती. घायाळ होऊन पडलेल्या पांखराप्रमाणें ती आपले पंख अद्याप फडफडवीत होती, त्या बंधनांतून मुक्त होण्याचा निष्फल यत्न करीत होती. तो कांहींशा हताशपणानें उद्गारला, " परंतु आजचं जग शास्त्राचा विज्ञानाचा हात धरूनच पुढें जात आहे. माणसाच्या लौकिक विकासाला कांहींच का अर्थ नाहीं ? "

" लौकिकापेक्षां अलौकिकाचं महत्त्व व मूल्य फार अधिक आहे. " महंत म्हणाले, " लौकिक विकास कितीहि पराकोटीला गेला तरी तो पाण्यावर उठणाऱ्या बुडबुड्यासारखा होय. त्यांत सौंदर्य असेल पण चिरंतनत्व नाहीं; इंद्रियांचं रंजन असेल पण आत्म्याचं समाधान नाहीं. आणि मनुष्य ही प्रगति तरी कोठपर्यंत करील ? शास्त्रालयांत अशीं उपकरणं कधीं सिद्ध होतील काय कीं ज्यामुळें परमेश्वराचं अस्तित्व सिद्ध होईल ? शास्त्रीय प्रगतीच्या अखेरच्या तळापर्यंत मनुष्य गेला तरी हें किंवा अशा इतर प्रश्नांचं ज्ञान त्याला होणार नाहीं. आणि मानवाचं अंतिम समाधान ह्या ज्ञानावरती अवलंबून आहे; आगगाडीच्या वा विमानाच्या शोधावरती नव्हे. हें ज्ञान वैदिक ऋषीना झालं याचं कारण तेव्हाचं आकाश निर्मळ होतं, उंच धुराड्यांतून बाहेर पडणाऱ्या धुराच्या वलयांनीं तें कलंकित झालं नव्हतं. पृथ्वी-

वर अग्निवर्षाव करूं पाहणारीं विमानं त्यांत संचार करीत नव्हतीं. तेव्हांचे जलाशय विशुद्ध होते, दारूचीं कोठारं वाहणारी गलबतं त्यांतून मार्गक्रमण करीत नव्हतीं. आणि मुख्य म्हणजे, ज्या बुद्धीच्या द्वारां हें ज्ञान मिळवायचं ती मानवी बुद्धिहि त्या काळीं अविकृत होती. अहंतेचे आणि मिथ्या जीवननिष्ठेचे संस्कार तिच्यावरती झालेले नव्हते. या अविकृत बुद्धीमुळेंच त्यांना त्या अंतिम सत्याचा साक्षात्कार झाला आणि 'हे अमरतेच्या अपत्यांनो,' अशी अवघ्या मानव जातीला त्यांनीं हांक मारली.

" नभोमंडळांत मस्तक घालून बसलेल्या अद्वैत ज्ञानाच्या ह्या शिखरावरून खालीं पहा ; म्हणजे राज्य,साम्राज्य,राजकारण यासारख्या गोष्टी किती लहान, क्षुद्र व हास्यास्पद आहेत हें कळून येईल. मेजावर मांडलेला बुद्धिबळांचा चिमकुला खेळ पाहिला आहेस ना? त्यांतल्या राजाला राजेपण नाहीं आणि वझीराला वझीरी नाहीं. लांकडाच्या एका कातीव तुकड्याला आपणच राजा बनवितों. एका चौकोनांतून दुसऱ्या चौकोनांत आपणच त्याला उचलून ठेवतों आणि त्याला असा जाण्याचा अधिकार आहे अथवा नाहीं असं म्हणतों. पण त्या लांकडी तुकड्याला खरोखर कांहीं अधिकार, कांहीं स्वयंभू वैभवपद आहे का ? डाव संपल्यावर साऱ्यांचे मानीव काल्पनिक अधिकार आणि पराक्रम नाहींसे होतात आणि एकाच खोक्यामध्यें सर्वांची सरमिसळ होते. राजा प्याद्यावर पडतो आणि घोडें वझीराच्या अंगावर विश्रान्त होतें ! हें सारं खोटं आहे, मानीव आहे हें आपल्याला समजतं. पण पृथ्वीच्या मोठ्या थोरल्या मेजावर जो हा बुद्धिबळाचा खे चालू आहे तो मात्र सत्य आहे असं आपण मानतों. कारण या खेळांतील प्यादीं आणि मोहरीं आपणच आहोंत. त्या तुकड्यांना बुद्धी नसल्यामुळें त्यांच्यावर अधिकाराचा आरोप इतर कोणाला तरी करावा लागतो. पण माणसांना बुद्धि असल्यामुळें ते आपापल्या गति आणि अधिकार आपणच निश्चित करतात. आणि या क्षुद्र डावामध्यें रममाण होतात. परंतु तें जितकं खोटं तितकंच हेंहि खोटं. तें जितकं काल्पनिक तितकंच हेंहि काल्पनिक व मानीव. कायसर हा जर्मनीचा राजा कां ? तर जर्मनींतील लोक त्याला राजा मानतात म्हणून. भारत देशाची सीमा हिमालयापर्यंत आणि पेशावरपर्यंतच कां ? तर भारतीय लोक तसं मानतात म्हणून. या खोटेपणाचं, कृत्रिम बंधनांचं ज्ञान म्हणजेच आत्म-

ज्ञान. सर्व ज्ञानांहून हें ज्ञान श्रेष्ठ आहे. कारण सभोंवारच्या तिमिराचा भेद करून सत्याचं प्रकाशमय दर्शन तें माणसाला घडवून देतं. या ज्ञानाचा साक्षात्कार झाला म्हणजे चराचरांतील भेदाभेद नष्ट होतात, देशादेशांतील सरहद्दी पुसून जातात, अनेकांतल्या एकतेचा प्रत्यय येतो."

"पण महाराज, या ज्ञानाची साधना करण्याचा मार्ग कोणता? ज्या विद्येला सध्याच्या जगांत महत्त्व आहे तिच्याकडून हें कार्य कधींतरी होऊं शकेल का!" वसुदेवानें विचारलें.

"ज्या विद्येला आजच्या जगांत महत्त्व आहे ती विद्या नाहीं; अविद्या आहे. अविद्या म्हणजे आत्म्याच्या भोंवतीं सर्पाप्रमाणें विळखा घालून बसलेलं अज्ञान, रजोगुणांच्या आणि तमोगुणांच्या संपर्कानं भ्रष्ट झालेलं सत्त्व. अविद्येतून अहंकार जन्माला येतो. अहंकारांतून स्वामित्व आणि स्वामित्वांतून वैर, लोभ, काम वगैरे वासना उत्पन्न होतात. माणसाच्या साऱ्या दुःखांचं व यातनांचं मूळ या वासनांत आहे. आजचं सारें जग म्हणजे ह्या अविद्येचा संसार होय. विद्या माणसांना मुक्त करते, तर अविद्या त्याला कायमचा बंदीवान करते."

वसुदेव म्हणाला, "पण या विद्येचा प्रत्यय ज्यांना आलेला आहे त्यांनीं जगांत जाऊन तिचा प्रसार करायला नको का? असे आत्मज्ञानी लोक जर रानावनांत डोंगर-कपारींत राहूं लागले तर या विद्येचा प्रसार होण्याची आशा कोणती?"

महंतांनीं किंचित् स्मित केलें. क्षणभर थांबून ते म्हणाले, "हा प्रश्न समर्थतेचा आहे. ज्यांच्यामध्यें जगांत जाऊनहि अलिप्त राहण्याचं सामर्थ्य आहे त्यांनीं तिथं जावं; नव्हे, ते जातातहि. रामकृष्ण, विवेकानंद अथवा रामतीर्थ यांनीं कांहीं जगाचा त्याग केला नाहीं. परंतु त्यांचा आत्मप्रत्यय मर्यादित नव्हता.'न माम् कर्माणि लिंपंति। न मे कर्मफले स्पृहा' अशा अलौकिक कोटीपर्यंत ते पोहोंचले होते. ज्यांच्यांत हें सामर्थ्य नाहीं त्यांनीं रानावनांत व डोंगरकपारींतच राहिलं पाहिजे. माझ्यामध्यें हें सामर्थ्य अद्याप आलेलं नाहीं. मोहाच्या संसर्गानें माझी स्थितप्रज्ञता एखादे वेळीं एकाएकीं ढासळून पडेल कीं काय अशी भीति मला वाटते. म्हणून मी या डोंगरावरतीं मला कोण्डून घेतलं आहे. निसर्गाच्या विराट् पार्श्वभूमीवरच या ज्ञानाची साधना

होणं सुलभ असतं. या विशाल पहाडाकडे नजर टाकली म्हणजे शरीराची क्षुद्रता मला जाणवते. प्रात:कालच्या सुवर्णप्रकाशांत उल्हसित होणारं येथील रानावनांचं सौंदर्य पाहिलं म्हणजे निस्वार्थ, वासनारहित आनंदाचे पाठ माझ्या मनाला मिळतात. या विशालतेंत अहंतेच्या भावना नष्ट होऊं लागतात, आणि आत्मिक जीवनाची कक्षा विस्तार पावूं लागते. पूर्व-कालांतील ऋषीमुनि वनवासांत जाऊन तपश्चर्या करीत, ते याच दृष्टींनं. हीं रानंवनं म्हणजे आमच्या पाठशाळा आहेत. या डोंगरकपारीच आमचीं विश्वविद्यालयं होत ! ”

“ इतरत्र जी विद्या किंवा अविद्या दिली जाते तींत पुस्तक या गोष्टीला प्राधान्य आहे ” वसुदेव म्हणाला. “ आपल्याला झालेलं ज्ञान चिरस्थायी करून तें समाजापर्यंत पोहोंचविण्याचं साधन छापखान्यासारख्या यंत्रांनीं उपलब्ध करून दिलं आहे. त्याचा तरी फायदा खऱ्या विद्येच्या प्रसारासाठीं घ्यायला नको काय ? ”

“ घ्यावा कीं; पण पुस्तक म्हणजे अखेरचं साधन नव्हे. कांहीं झालं तरी पुस्तकांतील अक्षरं मेलेलीं असतात. त्यांतील ज्ञान हें अचेतन असतं. वाहतं पाणी उपलब्ध नसलं तर सांचलेल्या डोहांतील पाणीहि प्यावं. पण उत्कृष्ट पाणी वाहत्या प्रवाहांतलें, हें मात्र विसरूं नये. खरी विद्या, खरें आत्मज्ञान हें केवळ गुरूपासूनच प्राप्त होतें. आचार्यवान् पुरुषो वेदा: हें छांदोग्यांतील वचन आहे. गुरूजवळ ज्ञानाचा वाहता जिवंत झरा असतो. ज्ञानफलाचा साक्षात्कार त्याच्या ठिकाणीं होऊं शकतो. मेलेल्या शब्दांचीं कलेवरं वाह-णाऱ्या पुस्तकांतून असा प्रत्यय कधींहि यावयाचा नाहीं. गुरूचा महिमा ईश्वरा-इतकाच मानला आहे याचं कारण हेंच होय. आत्मज्ञान झालेला मनुष्य म्हणजे संसारपाशांतून मुक्त झालेला, आपल्या मूलभूत तेजानें तळपणारा, चराचर सृष्टीशीं एकरूप झालेला, ईश्वरी तत्त्वाचा आविर्भाव ! अशा सिद्ध पुरुषाच्या पायाशीं जाणें म्हणजे ईश्वराच्या पायाशीं जाणें होय. ”

वेदाला अपौरुषेय कां म्हणतात याचें रहस्य त्या क्षणीं वसुदेवास जाणवलें. उंच काळ्या पहाडाच्या पार्श्वभूमीवर महंतांनीं आपल्या गंभीर आवाजांत उच्चारलेले ते शब्द त्याला अपौरुषेयच वाटले. ईश्वरी कृपेचें वरदान लाभलेलें जें मानवी मन संस्कृतीच्या प्रारंभापासून तिचें नेतृत्व करीत आलेलें आहे

तेंच आपल्या समोर मुखरित होत आहे असा त्याला भास झाला. तो भारावून गेला. रंगभूमीवरील एक अंधुक दृश्य नजरेआड होऊन दुसरा विस्मयजनक व ऐश्वर्यशाली देखावा एकदम त्या ठिकाणीं दिसूं लागावा. त्याच्या प्रकाशानं व वैभवानं दृष्टि दिपून जावी तसें त्याला झालें. भाववश होऊन तो उठला व त्यानें महंतांच्या पायावर डोकें ठेविलें. त्यांचे पाय घट्ट धरून त्यानें आपला नवा निर्धार बोलून दाखविला. तो म्हणजे महंतांचें शिष्यत्व पत्करून गडावर रहाण्याचा, त्यांच्या सहवासांत व सेवेंत आपलें आयुष्य घालविण्याचा. चार दिवसांसाठीं रणकालीच्या डोंगरावर आलेला वसुदेव त्या डोंगराचा कायमचा रहिवासी झाला.

● ● ●

## ६

चार वर्षें उलटून गेलीं.

—रणकालीच्या मंदिराजवळ ज्या संन्यस्त जीवनाची वसुदेवानें दीक्षा घेतली होती तें आतां त्यांच्या अंगवळणीं पडूं लागलें होतें.

पूर्वीच्या आयुष्यांतील अनेकविध प्रक्षोभ आणि कोलाहल त्या निवांत वातावरणांत विरून जाऊं लागले होते. पर्वतावरून उतरतांना खळखळ व आदळआपट करणारी नदी खालील मैदानावर येतांच गंभीर होते आणि तिच्या संथ प्रवाहांत अेका नव्या, जीवनदायी सामर्थ्याचा आत्मप्रत्यय निर्माण होऊं लागतो. वसुदेवाच्या जीवनास असेंच अेक नवीन वळण लागत होतें, नवा आकार येत होता.

महंतांनीं मानवी जीवनाचा व जीवनहेतूंचा जो विशाल पट त्याच्यापुढें उभा केला होता तो पाहिल्यावर, त्याला आपल्या पूर्वीच्या निष्ठा फार संकुचित वाटूं लागल्या. पूर्वीचे संग्राम निरर्थक वाटूं लागले. त्यांतील अर्थ येवढाच होता कीं, त्या साऱ्या घटनांतून ही घटना उत्पन्न होत होती. रात्रीच्या काळोखाचा प्रवाह उष:कालच्या प्रकाशाकडे वहात असतो, त्याप्रमाणें त्या असंख्य दिवसांचा ओघ या दिवसाकडे वहात होता. कोठलाहि भविष्यकाळ स्वयंसिद्ध असूं शकत नाहीं. भूतकालाचा धागा घेऊनच तो

समोर येत असतो. कटाशीं संबंध येऊन आपल्याला घराचा त्याग करावा लागला नसता तर रणकालीच्या डोंगरावर आपलें पाऊलहि पडलें नसतें. गुळाच्या भेलीला लागलेल्या मुंगळ्यांप्रमाणें जे असंख्य लोक जीवनांतील ऐहिकतेला बिलगून क्षूद्रपणानें जगत असतात, त्यांच्यांतच आपण जमा झालों असतों.

चिंतन आणि सेवा हे त्याच्या या नव्या आयुष्यक्रमांतील प्रमुख उद्योग होते. कर्तव्यकर्माचा त्याग करून आपण निष्क्रियतेकडे वळत आहोंत कीं काय अशी धास्ती त्याला सुरुवातीस वाटत असे. हें पलायन तर नव्हे, अशी शंका त्यास आल्याविना राहिली नाहीं. महंतांजवळ त्यानें ती अेकदां बोलूनहि दाखविली.

महंत उत्तरले, " जीवनाच्या बाहेर गेल्याशिवाय जीवनाचं यथार्थ स्वरूप कधींहि आकलन होणार नाहीं. पाण्यांत राहणाऱ्या माशाला नदीचा किंवा समुद्राचा समग्र देखावा कधीं दिसूं शकेल का ? मासा पाण्याबाहेर जाऊं शकत नाहीं. पण माणूस आपल्या प्रज्ञेच्या सहाय्यानें जीवनाबाहेर जाऊं शकतो. मानवाची बुद्धि ही पृथ्वीवरील सर्वश्रेष्ठ वस्तु आहे. माणसाचं मन म्हणजे साऱ्या चराचर अस्तित्वांतून उत्क्रान्त, विकसित झालेलें अेक अमोल व अद्‌भुत वैभव आहे. ईश्वर आणि सृष्टि यांच्यांतील दुवा म्हणजे माणसाची ही बुद्धि. या बुद्धीच्या मदतीनेंच माणसाला आपल्या संसाराची सरहद्द ओलांडतां येते. यांत कोठें निष्क्रियतेचा भास झाला तरी त्याची भीति बाळगतां कामा नये. पाश्चिमात्यांच्या संस्कृतींत माणसाचं ऐहिक सुख हें साध्य आहे. त्यासाठीं मानवी उद्योगाचा मोठा थोरला कारखाना त्यांना घालावा लागतो. या कारखान्यांत निष्क्रियता हा दोष गणला जाणें सहाजिक आहे. परंतु आमचा प्रपंच त्या तत्वावरती नाहीं. आमचें तत्त्वज्ञान वेगळें, साध्यहि वेगळें. दोन विरोधी दिशांना असलेल्या दोन घरांकडे अेका रस्त्यानें कधीं जातां येईल का ? ध्येय वेगळें म्हणून मार्गहि वेगळें. आमच्या साध्याच्या शोधासाठीं चिंतनाची, आत्मिक ज्ञानाची आवश्यकता आहे. किंबहुना आत्मज्ञान हेंच त्या ध्येयाकडे जाण्याचें अेकमेव साधन आहे. बंधमुक्त करतें तें ज्ञान असें ज्ञात्यांचें वचन आहे. अशा ज्ञानाच्या उपासनेंतून निर्माण होणारी निष्क्रियता ही खरोखरी निष्क्रियता नव्हेच. प्राचीन काळांतील

आमचे ऋषीमुनी अरण्यांत वा गिरिकंदरांत जाऊन रहात. ही निष्क्रियतेची भीति त्यांनीं कधीं बाळगली नाहीं ! ”

महंतांप्रमाणें वसुदेवहि आतां ‘स्वारी’ वर जाऊं लागला होता. सुरुवातीला तो त्यांच्याबरोबर जात असे. पुढें महंतांच्या सांगण्यावरूनच तो एकट्यानें जाऊं लागला. जाणत्या बापानें आपल्या मुलाला वेगळा संसार थाटून द्यावा त्याप्रमाणें महंतांनीं त्याची जबाबदारी त्याच्याच शिरावर टाकली. अेकाच रस्त्यानें दोघांनीं जाणें अनावश्यक आहे. आपल्यासारखीं हजारों माणसें आलीं तरी त्यांना पुरून उरेल अेवढें कार्य केवळ या डोंगराच्या पायथ्याशीं आहे, असे उद्गार त्यांनीं काढले होते.

या उद्गारांची यथार्थता वसुदेवाच्या प्रत्ययास रोज येत होती. त्या डोंगरांच्या जवळपास असलेल्या वस्तींत दारिद्रय, अज्ञान आणि रोग यांचा त्रिवेणी प्रवाह दुथडी भरून वाहत होता.

ज्या देशाच्या राजकीय मुक्ततेसाठीं तो तळहातावर शीर घेण्यास तयार झाला होता त्याचें भीषण, किळसवाणें आणि केविलवाणें स्वरूप त्याच्या डोळ्यासमोर नव्यानेंच उघडत होतें. सुजलाम्, सुफलाम्, मलयजशीतलाम् म्हणून ज्या भूमीचें अेक अद्भुतरम्य आणि मंगल चित्र त्याच्या मनांत स्थिर झालें होतें ती वास्तवांत किती वेगळी होती !

‘देशाची ओळख करून घेतल्याशिवाय देशभक्त होऊं नकोस’ हा महंतांचा विचार किती यथार्थ आहे हें त्याला पटूं लागलें. मधांत पडलेल्या माशीप्रमाणें त्याचें मन देशाच्या पूर्ववैभवांत आणि इतिहासांत गुंतून पडत असे. अशोक–चंद्रगुप्तापासून शिवाजी–बाजीरावापर्यंत झालेल्या अनेक महा-पुरुषांचीं चरित्रें त्याला स्फूर्ति देत होतीं. इतिहासांतील साऱ्या पराक्रमाच्या व त्यागाच्या घटनांची सुवर्ण सांखळी त्याच्या डोळ्यांपुढें अपूर्व तेजानें झगमगत होती. परंतु राजकीय इतिहासांत गुंतलेल्या त्याच्या मनाला महंतांनी बाहेर आणण्याचा यत्न केला होता.

ते म्हणाले होते, “महापुरुषांचीं चरित्रें वंदनीय आणि स्फूर्तिदायक असतात यांत शंकाच नाहीं. परंतु त्यांच्या काळांत जाऊन त्यांचं अनुकरण करूं पहाणें ही त्यांचीच विटंबना होय. शिवाय इतिहासाकडे पहाण्याची दृष्टीहि बदलली पाहिजे. इतिहास म्हणजे केवळ राजेराण्यांचीं चरित्रं नव्हत

कीं पुढाऱ्यांनीं घडवून आणलेल्या लढायांची हकीगत नव्हे. कोटयवधि मानवांची यात्रा कोणत्या मार्गानें जात होती आणि कुठें जात होती हें ज्या इतिहासावरून समजणार नाहीं तो इतिहास अपूर्ण होय! माणसाचें भवितव्य उजळ करण्यासाठीं या इतिहासाचें निरीक्षण करणें आवश्यक आहे. हा इतिहास लक्षांत घेतला जात नाहीं म्हणूनच राज्यकर्ते आणि प्रजाजन, पुढारी आणि अनुयायी यांच्यामध्यें एक अनुल्लंघनीय दरी निर्माण झाली आहे. राजवाड्यांतील सिंहासनांकडे पाहून नव्हे तर खेड्यापाड्यांतील कंगाल खोपट्यांकडे पाहून जो राजकारण करील तोच अखेरचें यश संपादन करील !"

महंतांचे हे उद्गार आतांच खरोखर वसुदेवाच्या ध्यानांत येऊं लागले होते.

रणकालीच्या पायथ्याजवळ असलेल्या प्रदेशांत साराच काळोख पसरला आहे असें त्याला आढळून आलें. जगांत सुरू झालेल्या विसाव्या शतकाचा मागमूसहि या ठिकाणीं दिसत नव्हता. कोठलीहि यंत्रें नाहींत, सुधारणा नाहींत, शिक्षण नाहीं ! माणूस आणि पशू यांच्यामधील सीमारेषा तेथें फार अस्पष्ट झालेली होती. आहार, निद्रा, भय व मैथुन या जीवनाच्या चतुःसीमा होत्या. त्यांतहि आहाराचा प्रश्न विशेष महत्त्वाचा. चाकाची धाव मधल्या आसाच्या प्रेरणेनें आणि त्याच्या सभोंवार गरगरत असते त्याप्रमाणें त्या माणसांचें सर्व जीवित त्या अेका प्रश्नाभोंवतीं अगतिकपणानें घुमत होतें. प्रेम, प्रामाणिकपणा, सत्य, अब्रू, शील वगैरे गोष्टींना बाहेरच्या जगांत खूप महत्त्व होतें. परंतु येथें अन्नाची किंमत या सर्वांच्या बेरजेहूनहि जास्त होती. भाकरीच्या मोबदल्यांत मिळणार नाहीं अशी कोणतीहि गोष्ट नव्हती. या सततच्या दुर्भिक्षामुळें अेक भयानक दैवाधीनता सर्वांच्या विचारावर सावट पसरून बसली होती.

काळोखाच्या या अफाट संचयामध्यें कुठून प्रकाश टाकावा आणि किती टाकावा ? वाहत्या नदीचें पात्र ओंजळीनें रिकामें करण्यासारखाच उद्योग होता तो. परंतु तरीहि तो करणें आवश्यक होतें. समाजजीवनाच्या वरच्या मजल्यावर बसून ज्यांनीं जगाचा उद्धार करण्याचा कारभार आरंभला आहे असे लोक थोडेथोडके नसतात. त्यांचाहि कांहीं उपयोग होत असेल. परंतु जास्त आवश्यकता आहे ती खांद्यावर चिरे घेऊन व हात चिखलांत घालून

त्या मंदिरासाठीं नवा पाया घालणाऱ्या अगणित श्रमकर्त्यांची. येथें केवळ कष्टच जास्त आहेत असें नाहीं, तर मोबदलाहि कमी आहे. सोन्यारुप्यांत रूपांतरित होणारी व्यावहारिक प्रतिष्ठा तर तेथें नाहींच, परंतु वाऱ्याप्रमाणें निराकार असलेली कीर्तीहि नाहीं. चिरा वाहणाऱ्याचें नांव कधीं चिऱ्यावर खोदलें जात नाहीं... परंतु महंतांनीं सांगितलें त्याप्रमाणें, सारा प्रश्न केवळ स्वतःच्या समाधानाचा आहे, श्रद्धेचा आहे.

वसुदेवाच्या जीवनांत या चार वर्षांमध्यें मोठा बदल झाला त्याप्रमाणें दुसऱ्याहि एका व्यक्तीच्या जीवनांत फार मोठा फरक घडून आला होता. ही व्यक्ति म्हणजे जान्हवी होय.

जान्हवीनें आतां यौवनांत प्रवेश केला होता. कलेकलेनें वृद्धिंगत होणारा चंद्र पूर्णिमेच्या रात्रीं संपूर्ण वैभवानें आकाशांत प्रगट व्हावा त्याप्रमाणें तिच्या बाल्याचें रूपांतर तारुण्यांत झालें होतें. तिचें मन तर वयाची मर्यादा न मानतां अगोदरच पुढें जाऊन बसलें होतें. आतां शरीरहि त्या नव्या तळावर येऊन ठेपलें होतें. सूर्योदय होतांच पूर्वाभिमुख होऊन आपली पाकळी न् पाकळी फुलविणाऱ्या सूर्यफुलाप्रमाणें तिचें शरीर आपलें अंगभूत लावण्य संपूर्णतेनें व्यक्त करूं लागलें होतें. तळ्यावरून ओलेत्यानें कमरेवर कळशी घेऊन येणारी जान्हवी आतां सभोंवार चोरटे दृष्टिक्षेप टाकीतच घराकडे येत असे. ती निर्जनांत रहात होती हें खरें; परंतु निर्जनांत उमलणारीं फुलेंसुद्धां आपला परिमळ सभोंवार उधळल्याशिवाय रहात नाहींत. या परिमळानें अखादेवेळीं वसुदेवाचें मन धुंद होऊन जाई. परंतु सराईत सारथ्याप्रमाणें आपल्या मनाची गति नियंत्रित करण्यास तो आतां शिकला होता. एक दिवशीं त्याला या बाबतीत अखेरची परीक्षा द्यावी लागली.



वसुदेव सकाळच्या वेळीं बाहेरच्या अंगणांत एकटाच उभा असतां जान्हवी फुलें काढण्यासाठीं बाहेर आली. नुकतीच नाहून आल्यामुळें तिचे किंचित् ओलसर असलेले केस पाठीवरती मोकळेच सोडलेले होते. आपल्या मोकळ्या केसांशीं चाळा करीत ती फुलें खुडीत होती. परंतु आज त्या कामांत तिचें फारसें लक्ष दिसत नव्हतें. फुलें खुडतां खुडतां ती एकदम वसुदेवाकडे वळली आणि म्हणाली :

" वसुदेव, मी तुम्हांला आवडते का हो ?"

झाडांतून सुळकन् खार बाहेर पडावी त्याप्रमाणें तो प्रश्न अगदीं अनपेक्षित-पणें वसुदेवाच्या कानांवर पडला.

" आवडतेस तर !"

" खरंच ?"

" अगदीं खरं ! फार फार आवडतेस."

" कां बरं ?"

जान्हवीच्या या प्रश्नाला उत्तर देणें वसुदेवास जरा कठिणच वाटलें. पण कांहीं तरी उत्तर देणें आवश्यक होतें. उत्तर घेतल्याशिवाय स्वस्थ राहणारी मुलगी नव्हती ती.

तो किंचित् हंसला आणि म्हणाला, " कां बरं काय ? तूं फार चांगली आहेस—"

" म्हणजे काय आहे ?"

" म्हणजे—म्हणजे स्वभावानं आनंदी आहेस, प्रेमळ आहेस आणि मुख्य म्हणजे रानांतल्या एखाद्या वेलीसारखी निष्पाप आहेस !"

जान्हवीची प्रश्नमाला एकदम थांबली. क्षणभर कोठल्या तरी विचारांत ती मग्न होती. परंतु त्या घटकेला तिच्या मनाचा कल प्रश्न निर्माण करण्या-कडे होता, निर्णय देण्याकडे नव्हता. जरा वेळ थांबून ती पुन्हां म्हणाली, " रानांतली वेल निष्पाप कशी, हें मला कळत नाहीं !"

" माणसाच्या जगांतील वाईट गोष्टींचे संस्कार तिला स्पर्शहि करूं शकत नाहींत म्हणून ती निष्पाप." वसुदेव उत्तरला. परंतु हें उत्तर केवळ शाब्दिक आहे हा विचार तें उत्तर देत असतांनाच त्याच्या मनांत आल्याशिवाय राहिला नाहीं. जान्हवी यावर पुन्हां कांहीं न विचारील तर बरें, असें त्यास वाटलें. परंतु जान्हवीनें तें समाधान त्यास मिळूं दिलें नाहीं. ती चटकन् उद्गारली,

" समजा, त्या रानांतल्या वेलीनं पाप करायचं ठरवलं, तर काय करील ती? "

वसुदेव गोंधळला. एका सांकेतिक कल्पनेच्या आहारीं जाऊन त्यानें तिचा आश्रय घेतला होता खरा. पण ही कल्पना इतकी निरर्थक असेल याची त्याला कधींच जाणीव झाली नव्हती. दोन्ही हातांनीं त्यानें समोर आलेल्या

पराभवाचा स्वीकार केला आणि कांहींशा क्षीण, गोंधळलेल्या स्वरांत तो म्हणाला, " वेल काय पाप करणार ? पापाच्या पलीकडे असते ती ! "

" मला वाटतं, वेलीला पानं, फुलं येतात हें तिचं पापच असावं." जान्हवी गंभीरपणानें उद्गारली.

" त्यांत कसलं पाप आहे ? तो तिचा नैसर्गिक धर्मच आहे ! "

" नैसर्गिक धर्माचं पालन करणं म्हणजेच माणसाच्या दृष्टीनं पाप करण्यासारखं आहे ! —"

जान्हवी हें काय बोलत आहे व कां बोलत आहे हें वसुदेवाच्या ध्यानांत येईना. एखाद्या अपरिचित दृश्याकडे पहावें त्याप्रमाणें तो नवल्या दृष्टीनें तिच्याकडे पाहूं लागला.

जान्हवीनें पुन्हां क्षणभरांत आपला रंग बदलला. सूर्यास्ताचे वेळीं पश्चिम आकाशांत तरंगणाऱ्या अभ्रखंडाच्या तलम, मऊ पोटांतून वेगवेगळे रंग भराभर पसरत व ओसरत जावेत त्याप्रमाणें जान्हवीच्या भावनाचे नवनवे आविर्भाव क्षणभरांत उमलत आणि लगेच मावळूनहि जात. रानवेलीच्या पापमीमांसेचा धागा तिनें तेथेंच सोडून दिला. पराभूताचा पुन्हा पराभव करण्यांत कांहीं हंशील नाहीं असेंहि तिला कदाचित् वाटलें असावें. स्वतःचा विजय आणि वसुदेवाचा पराभव या दोनीहि गोष्टी एका मोकळ्या व मधुर हास्यांत तिनें बुडवून टाकल्या. त्यानंतर वसुदेवाच्या नजरेंत आपली नजर गुंतवून ती म्हणाली, " मी तुम्हांला आवडतें, याचीं इतकींच का कारणं ? "

" मग आणखी किती कारणं हवीं आहेत तुला ? "

" तो पलीकडचा दगड मला फार आवडतो, हें ठाऊक आहे का तुम्हांला ?'

"तो दगड ? कां म्हणून ? "

" वा ! फारच सज्जन आहे तो. बिचारा अहोरात्र जागच्या जागीं बसून राहतो. कोणाच्याहि कपाळावर जाऊन आदळत नाहीं की कोणाच्याहि वाटेंत आडवा पडत नाहीं ! "

" हा कांहीं त्याचा गुण नाहीं; तें बंधन आहे. "

" निष्पापपणा हा देखील माझा गुण नसावा मग ! यापेक्षां आवडी-निवडीला कांहीं जास्त सबळ कारण पाहिजे ! एखादं चांगलं कारण सांगा कीं ! "

"आज माझ्याकडून स्तुति करून घ्यायचा निर्धार केला आहेस वाटतं!"

"हो? दुसरं कोण आहे या डोंगरावर स्तुति करायला?" जान्हवी उत्तरली.

"कां? महाराजसुद्धां सारखी तुझी स्तुति करतात कीं. मला तर वाटतं, करायला नको इतकी करतात. फार शेफारून ठेवली आहे त्यांनीं तुला!"

जान्हवी जगूं भांडणाच्या शोधांतच होती. कपाळाला आठ्या घालीत आणि आपले विशाल डोळे संकुचित करून ती उद्गारली, "कांहीं तरीच काय बोलतां हो? तुम्हां पुरुषांना काळीज नांवाची कांहीं वस्तु दिलीच नाहीं देवानं!"

"महंतांनासुद्धां?"

"शुक्!" जान्हवी नाकावर तर्जनी ठेवून धाकदपटशाच्या स्वरांत म्हणाली, "आपल्या बोलण्यांत बाबांचं नांव असं येतांजातां घ्यायचं नाहीं हं!...बरं, तें राहूं द्या. एक गोष्ट विचारतें, खरं उत्तर द्याल का?"

"माणसामाणसांतील व्यवहाराचं रूपांतर जियें बाजारांत होतं तिथेंच खोटयाचा आश्रय घ्यावा लागतो! इथें खोटं बोलायचं कारणच नाहीं!" वसुदेव उत्तरला.

"तें ठाऊक नाहीं मला. माझा प्रश्न फार साधा आहे!"

"प्रस्तावनाच फार होते आहे!"

"बरं मी विचारतें ह! माझा प्रश्न असा कीं..कीं.."

"किती अडखळतेस! अलीकडे हें नवीनच दिसतं आहे!"

सारें मनोधैर्य एकदम एकवटल्याप्रमाणें करून जान्हवी उद्गारली, "मी दिसायला बरी आहे का?"

"वा! फारच चांगली आहेस!" वसुदेव हंसून उत्तरला.

"पुरे झालं! कांहीं तरी तोंडदेखलं बोलता झालं!"

"या प्रश्नाच्या उत्तरासाठीं तोंडदेखलं बोलणं जरूरच आहे! बरं बुवा, फार वाईट आहेस तूं दिसायला!"

"म्हणजे सारंच खोटं!" जान्हवीनें तोंड बाजूला वळविलें. आपल्या मुद्रेवर पसरलेली लालसर लज्जा वसुदेवास दिसूं नये अशी तिची इच्छा होती कीं काय कोणास ठाऊक! परंतु वसुदेवाला ती जाणवल्याशिवाय राहिली नाहीं. तो किंचित् अस्वस्थ झाला. काय बोलावें हें त्याला कळेना.

जान्हवी तशीच तोंड फिरवून उभी होती. हाताशीं असलेली डाळिंबाच्या झाडाची एक फांदी तिनें धरली आणि तिच्यावर उमललेल्या एका लालबुंद, टपोऱ्या फुलाच्या पाकळ्या आपल्या हातानें ती विलग करूं लागली. कोठल्या तरी अपेक्षेनें तिचें सारें शरीर पुलकित झालें होतें. चेहऱ्यावरचा लालिमा वाढत होता, फुलावरील हात थरथरत होता. कांहीं कारण नसतां, ती एकदम दचकली आणि खांद्यावरून मागे दृष्टिक्षेप करून तिनें आपला पदर सांवरून घेतला.

वसुदेवाचें चित्त क्षणभर विचलित झाल्याशिवाय राहिलें नाहीं. परंतु निष्ठेच्या आणि निग्रहाच्या साखळदंडांमध्यें मनाचीं हीं उद्दाम चेष्टितें बांधून ठेवण्याची त्याला संवय होती. गवताच्या पात्याप्रमाणें प्रवाहांत वहात जाणें हें सर्वांत मोठें पाप आहे, दौर्बल्य आहे असें त्यास निश्चयानें वाटत असे. अनंत मोहांनीं आणि मृगजलानीं भरलेल्या एका यक्षनगराचा सोनेरी दरवाजा जान्हवी आपल्या हातानें उघडीत आहे आणि त्या दाराच्या उंबऱ्यावर उभी राहून आपल्याला आंत येण्यासाठीं आमंत्रण देत आहे असा त्याला भास झाला. परंतु लगेच त्याच्या मनांत विचार आला कीं हा सारा आपल्याच मनाचा खेळ असावा ! नव्या जीवनाच्या स्वीकारामुळें, अंतःकरणाच्या तळाशीं जाऊन बसलेले वैषयिक वासनांचे सर्प पुन्हां अंगाला विळखे घालीत धुसफुसूं लागले आहेत. या मोहाचा इथेंच प्रतिकार केला पाहिजे. अधोगतीची सुरुवात पहिल्या पायरीवर होते, परंतु तिचा शेवट मात्र शेवटच्या पायरीवरच होतो. मध्यें कोठेंहि थांबायला जागा नसते. थांबणें शक्यहि नसतें.

वसुदेवाला स्त्रीच्या सहवासाचा पूर्वीचा अनुभव नव्हता असेंहि नाहीं. त्याच्या पूर्वीच्या जीवनांत नीति-अनीतीच्या कल्पनांना त्यानें फारसा थारा दिला नव्हता. रणांगणावर जाणारे सैनिक नीतीची मर्यादा पाळूं शकत नाहींत. मोठ्या पुण्याच्या पोटांत लहान पापें दडून जातात. विशाल ध्येयाकडे ज्यांचीं जीवनें वहात असतात त्यांना लहान व्यावहारिक ध्येयांकडे लक्ष देण्यास अवसर रहात नाही. तशी अपेक्षाहि करणें चूक आहे. समाजाच्या किंवा राष्ट्राच्या रक्षणासाठीं जे आपल्या जीवनावर निखारा ठेवायला सिद्ध होतात त्याच्या सुखासाठीं समाजानेंहि आपले पाश सैल केले पाहिजेत असें

त्यास व त्याच्या अनेक मित्रांना वाटे. अशा विचारामुळें, संधि सांपडेल त्या-प्रमाणें त्यांनें स्त्रीसहवासाचा लाभ घेतला होता. त्याचा त्याला कधीं पश्चात्तापहि झाला नाहीं. परंतु आज त्याच्या निष्ठा बदलल्या होत्या. त्याच्या जीवनाचा ओघ वेगळ्या, अगदीं भिन्न अशा दिशेनें वाहूं लागला होता.

आजहि तो नीति–अनीतीच्या पलीकडे गेला होता यांत कांहीं शंका नाहीं. पूर्वीप्रमाणें आजहि तो त्या विचारांच्या पैलथडीस येऊन उभा राहिला होता. परंतु आतांच्या जीवनांत शारीरिक वासनांना व विचारांना जागा नव्हती. त्या मान्य करणें म्हणजे ईश्वराकडे पाठ फिरवून पराभवाचा स्वीकार करणें होतें.

तो कांहीं न बोलतां तसाच निघून गेला. जान्हवी किती तरी वेळ त्या डाळिंबाच्या झाडाजवळ एकटीच उभी होती.

● ● ●

वसुदेव संध्याकाळीं परत आला तेव्हां जान्हवी त्याच्याशीं नेहमींप्रमाणें हंसतखेळत बोलली नाहीं. केवळ विचारलेल्या प्रश्नांचीं मोजकीं उत्तरें देऊन ती आपल्या कामांत व्यग्र रहात होती.

तो परत आला तेव्हां महंत बाहेरील पर्णगृहांत कोणाशीं तरी बोलत होते.

आलेला मनुष्य मुक्कामासाठीं आलेला पाहुणा असावा असें वसुदेवास वाटलें. कारण बाहेरच्या दालनामध्यें प्रवासी माणसाचें थोडेंसें सामान एका कोपऱ्यांत ठेवलेलें होतें.

तो आंत जाऊन जान्हवीस म्हणाला, " बाहेर कोणी आलंय् वाटतं ? "

" हो. "

" कोण आहे ? "

" कुणास ठाऊक ! "

" राहायला आले आहेत ? "

" असं वाटतंय् ! "

जान्हवी काम करतां करतां बोलत होती. पण त्यांत खऱ्या व्यग्रतेपेक्षा व्यग्रतेचा देखावाच जास्त आहे असें वसुदेवास वाटलें.

तो पुढें होऊन जान्हवीच्या जवळ जाऊन उभा राहिला.

" जान्हवी, रागावलीस का ? "

" भलतंच ! कशाबद्दल ? "

" तुला ठाऊक आहे कशाबद्दल तें ! "

जान्हवी भिंतीला टेकून उभी राहिली. क्षणभर ती कांहींच बोलली नाहीं. हातांतील अेक बांगडी मागेंपुढें सरकवीत, बोलावें कीं न बोलावें याचा जणूं ती विचार करीत होती.

अखेरीं कांहीं तरी निश्चय झाला; बांगडीवर खिळलेली तिची दृष्टि एकदम वरती वळली. बोलायचें तें बोलून टाकावें अशा निर्धारानें, परंतु कांहींशा संकोचानें ती म्हणाली, " माझंच चुकलं हें मला ठाऊक आहे. राग खरोखर तुम्हांला यायला हवा. पण—पण—"

" पण काय ?"

" पण—कांहीं नाहीं ! खरंच, मला कांहीं कळतच नाहीं."

" काय कळत नाहीं ?" वसुदेवानें विचारलें.

" तेंहि सांगतां येत नाहीं. इतकंच सांगतें कीं सकाळचं कांहीं लक्षांत ठेवायचं नाहीं."

" मी नाहीं लक्षांत ठेवणार तें ! पण तूंहि हें लक्षांत घ्यायला हवं कीं यौवनांतील मोह मोठे बलशाली असतात ! मोहाला शरण जाण्यांत नव्हे तर त्यांच्यावर निग्रहानें विजय मिळविण्यांत माणसाची खरी माणुसकी आहे. स्वामीजींची हीच शिकवणक नाहीं का आपल्याला ?"

" हो, आहे–आहे—" जान्हवी खालीं मान घालून चाचरत उद्गारली.

" बाहेरच्या जगांतील लोकांप्रमाणें आपलीं जीवनं अंधारानें वेढलेलीं नाहींत. एका तेजोमय पवित्र दिव्याच्या प्रकाशांत आपण वावरतों आहोंत. जान्हवी, तूं आतां पूर्वीसारखी लहान नाहींस. तुला सारं कांहीं कळतं आहे. तूं मागें एकदां मला म्हणाली होतीस, कीं मोठी झाल्यावरहि मी अशीच हंसत खेळत राहीन कीं काय याची मला भीति वाटते. त्या भीतीचा तेव्हां न कळलेला अर्थ तुला आतां कळूं लागला असेल. मी इथें आज आहें, उद्यां कदाचित् नसेनहि. पण तुझें स्त्रीत्व तुझ्याजवळ राहणार आहे, तुझं तारुण्यहि तुझ्याजवळ राहणार आहे. सोन्याच्या लगडीचें सुंदर अलंकारांत रूपांतर करतात त्याप्रमाणें या नैसर्गिक शक्तीचें रूपांतर एका श्रेष्ठ, निःस्वार्थ आणि अपार्थिव शक्तींत माणसानं केलं पाहिजे.

"प्रत्येक माणसानं आनंदानं व हंसतखेळत राहिलं पाहिजे यांत मुळींच शंका नाहीं. कोणालाहि न दुखविणारं, सर्वांना सुखविणारं हास्य ही संसारांतील एक अमूल्य गोष्ट आहे. पण हें हास्य मनाच्या विशुद्धतेंतून आणि असीम प्रेमांतून निर्माण व्हायला हवं, शारीरिक वासनांतून नव्हे. कोणाचं हास्य डोंगरावरून नाचत बागडत येणाऱ्या निर्झरासारखं असतं, तर कोणाचं हास्य शहरांतील गटारांसारखं, शहराचा सगळा कलंक व कालिमा घेऊन खदखदणाऱ्या गटारांसारखं असतं. तुझं हास्य जन्मतःच निर्मल आहे. एक अमोल ठेवा म्हणून त्याचं तूं जतन केलं पाहिजस."

बोलतां बोलतां वसुदेव कांहींसा भाववश झाला. त्यानें एकदम जान्हवीच्या पाठीवर हात ठेवला. "जान्हवी, तूं अशी दुःखी, उदास झालीस तर मला फार वाईट वाटेल. तूं पूर्वीप्रमाणें आनंदी असली पाहिजेस, हंसलं पाहिजेस. हांस पाहूं—"

वसुदेवाचा हात पाठीवर येतांच जान्हवीचें ऊर भरून आलें होतें. मोठ्या प्रयासानें तिनें रडूं आवरून धरलें. परंतु तरी डोळ्यांत आंसवें जमल्याशिवाय राहिलीं नाहींत. डोळे उचलून तिनें वसुदेवाकडे बघितलें व ती हंसली. कारंजांतून उडणाऱ्या तुषारांत उषःकालचे किरण मिसळावे त्याप्रमाणें हास्य होतें तें.

"मीं सांगितलं तें ध्यानांत राहील ना ? तसं वागशील ना ?"

"हो. मी प्रयत्न करीन—" जान्हवी नम्रपणें अुत्तरली.

चुलीवर तापवायला ठेवलेलें दूध उतूं येऊं लागलें होतें. यौवनांतील अदम्य विचारविकारांप्रमाणें तें सभोंवारचीं बंधनें झुगारून वरती उसळून येत होतें. जान्हवीनें चटकन् पुढें होऊन भांडें खालीं उतरविलें.

"दूध घेणार ना ? बाहेरहि द्यायचंय् !"

"बाहेर कोण पाहुणे आले आहेत सांगितलं नाहींस. आतां राग मावळला—"

"बघा हं, आतां मात्र खरंच रागावेन मी !"

"बरं, राहिलं. कोण आलंय् ?"

"कोणी चित्रकार आहेत. गडावरचीं कांहीं चित्रं काढायचीं आहेत त्यांना."

"अरे वा ! आतां जान्हवीच्या चित्रकलेलाहि पुन्हां बहर येणार तर कलेच्या सान्निध्यांतच कलेचा विकास होतो असं म्हणतात."

जान्हवीनें हातांतील कपबशा खालीं ठेवल्या आणि कमरेवर हात ठेवून ती वसुदेवाकडे कृतक कोपानें पहात उभी राहिली.

• • •

# ७

चित्रकार महंताच्या मठांत रहावयास येऊन तीनचार दिवस होऊन गेले होते.

तो कोणाशींहि फारसा बोलत नसे. तासन् तास स्वत:मध्यें गुरफटून बसण्याचें विचित्र सामर्थ्य त्याच्या ठिकाणीं होतें; परंतु संकोचाचीं आवरणें बाजूला करून तो जेव्हां बोलत असे तेव्हां त्याचें बोलणें फार मनोरंजक वाटे. शब्द ही चीज त्याच्या हिशेबीं कांहींतरी स्वतंत्र स्वरूपाची होती. त्याच्या शब्दांतून त्याचीं मतें अथवा त्याचें अंत:करण सांपडणें फार कठीण होतें. अेखादें हत्यार कधींनवत उपयोग करण्यासाठीं परजून ठेवलेलें असावें त्याप्रमाणें त्यानें आपली वाणी परजून ठेवली आहे कीं काय असें वाटायचें.

चित्रकारानें आपल्याला चित्रें आणि चित्रकला यांविषयीं कांहींतरी सांगावें असें वसुदेवास वाटत असे या प्रांताचा त्याला फारसा परिचय कधींच होऊं शकला नव्हता. परंतु सुंदर संगीताप्रमाणें सुंदर चित्रेंहि त्याला आवडत असत. अेखादें मनोहर दृश्य पाहिल्यावर, हें कुंचल्यांनीं आपल्याला कागदावर उतरवितां आलें असतें तर बरें झालें असतें असा विचार त्याच्या मनांत आल्यावांचून रहात नसे. त्याला चित्रकलेविषयीं माहिती नव्हती, पण कुतूहल होतें. परंतु चित्रकार आपल्या व्यवसायाविषयीं फार क्वचित् व कमी बोलत असे. जणूं या दालनावरती त्यानें अेक जाडा पडदा टाकून ठेवला होता व हा पडदा इतरांसमोर दूर करणें त्याला इष्ट वाटत नसे. वसुदेवास नवल वाटायचें. प्रत्येकजण आपल्या व्यवसायाबद्दल बोलण्यांत सहसा आनंद मानतो. सुतार सुतारकीबद्दल बोलतात, लोहार लोहारकीबद्दल बोलतात, वकील वकिलीबद्दल व राजकारणी राजकारणाबद्दल बोलतात. मग या चित्रकारानें चित्रकलेबद्दल बोलायला कां हरकत असावी ? हा संकोच आहे कीं

अभिमान आहे ? इतर व्यवसायांच्या बाबतींत उद्‌भवत नाहीं असा कोणता संकोचाचा अथवा अभिमानाचा मुद्दा चित्रकलेसारख्या कलेच्या बाबतींत उद्‌भवतो ? परंतु हा तरुण चित्रकार स्वभावानें इतका सौजन्यशील होता कीं त्याचा अभिमानहि खुपण्यासारखा नव्हता. त्यामुळेंच वसुदेव आणि महंत या दोघांनाहि त्याजविषयीं प्रेम वाटत होतें.

" तुम्हांला कसलीं चित्रं काढणं विशेष आवडतं ! " वसुदेवानें एकदां चित्रकारास विचारलें.

" कसलींहि ! "

" तरी त्यांत कांहीं आवडनिवड असेलच कीं नाहीं ? "

" विशेष नाहीं—"

" मग इतक्या दूरवर, या डोंगरावरती चित्रासाठीं कसे आलांत ? "

चित्रकार खालीं पाहून हंसला आणि म्हणाला, " मुद्दाम आलों असं नाहीं. या भागांत आलों, या डोंगराची प्रसिद्धी ऐकली. म्हटलं जाऊन यावं एकदां ! "

" आमच्या जान्हवीलासुद्धां चित्रकलेची फार आवड आहे ! लहानपणीं ती नेहमीं मातीचीं चित्रं तयार करायची ! "

जान्हवीचें नांव कानीं पडतांच चित्रकार कांहींसा कावराबावरा झाला. क्षणभरानें तो हलकेंच म्हणाला, " मला ठाऊक आहे तें ! "

" कसं समजलं ? "

" माझ्या गैरहजरींत माझ्या या साहित्याची व चित्रांची त्या नेहमीं विचारपूस करतात असं आढळून आलं मला ! "

" काय करते ती ? "

" मी बाहेरून येण्याच्या आंत माझा सारा पसारा नीटनेटका आवरून ठेवतात !"

वसुदेव मोठ्यानें हंसला व म्हणाला, " आमच्या जान्हवीला अव्यवस्थितपणा मुळींच सहन होत नाहीं ! प्रत्येक वस्तूला एक जागा असते आणि त्या जागेवरच ती राहिली पाहिजे अशी शिकवणूक आहे तिला. "

" माझा हा अस्ताव्यस्त कारभार पाहून त्या फार रागावत असतील ? "

" कुणास ठाऊक! स्त्रियांचे स्वभावधर्म फार विचित्र असतात! आमच्यां-

त बेशिस्तपणा नाहीं म्हणून आमच्यावरच रागावत असेल ती कदाचित्! तुम्हीं तिला आवरसावर करायची भरपूर संधि देतां आहांत. स्त्रियांची सद्‌गुणावर श्रद्धा असली, तरी सद्‌गुणी माणसं त्यांना फारशीं मानवत नाहींत. दुर्गुणांना सद्‌गुणाच्या मार्गावर नेण्याचं कार्यच त्यांना अधिक प्रिय असतं!"

"माझ्यासारख्याच्या संगतींत हें कार्य जन्मभर पुरेल त्यांना!" चित्रकार हंसत उत्तरला.

"तुमच्या ठिकाणीं बेशिस्तपणा हा दुर्गुण होत नाहीं! कलावताचं लक्ष फार मोठ्या गोष्टींत गुंतल्यामुळें लहानसहान गोष्टींकडे त्याचं दुर्लक्ष व्हावं हें कांहीसं साहजिक आहे."

"निदान एवढ्या भांडवलावर तरी मी कलावंत या पदवीवर हक्क सांगूं शकेन!"

"हें खरं नाहीं!" वसुदेव आवेशानें म्हणाला; "मी ज्ञाता नसलों तरी तुमच्या चित्रांचं सौंदर्य समजूं शकतों. शिवाय, ज्याची कलासक्ति व प्रतिभा मोठी आहे असा माणूसच आपल्या कलेसाठीं असा जीव पाखडूं शकतो."

चित्रकाराची मुद्रा संकोचानें किंचित् आरक्त झाली.

"तुम्हांला एक प्रश्न विचारूं का?" वसुदेवानें एकदम विचारलें.

"विचारा ना!"

"तुम्हांला आयुष्यांत फक्त एकच चित्र काढायची परवानगी दिली तर कसलं काढाल तें?"

वसुदेवाची कल्पना होती कीं, चित्रकार विचारासाठीं थोडा अवधी घेऊनच या प्रश्नाचें उत्तर देईल. पण तसें झालें नाहीं. तो लगेच उत्तरला,

"माणसाचंच चित्र असेल तें!"

"कोणत्या माणसाचं?'

"विवस्त्र स्त्रीचं!"

"विवस्त्र स्त्रीचं? कारण—" वसुदेव आश्चर्यानें उद्‌गारला.

"शरीर आणि मन यांच्या सौंदर्याचा उत्कृष्ट मिलाफ अशाच चित्रामध्यें होऊं शकेल असं मला वाटतं."

"पण या स्त्रीला कांहीं नांवगांव असणार नाहीं का? विवस्त्र म्हणतां त्या

अर्थी ती स्त्री सर्व स्त्रीजातीची प्रातिनिधिक असणार यांत शंका नाहीं. पण तिला तोंडवळा कुणाचा !" वसुदेवानें विचारलें.

" तें अजून ठरवलं नाहीं. कारण तसा प्रश्नच माझ्यासमोर कधीं आला नाहीं !"

चित्रकार हें अभावितपणानें बोलला खरा. पण ते शब्द उच्चारतांना एक सुंदर तेजस्वी चेहरा झरकन त्याच्या डोळ्यांसमोर येऊन गेला.

● ● ●

## ८

तिन्हीसांजाची वेळ झाली होती.

पर्णगृहांतील दिवा लावण्यासाठीं जान्हवी पुसलेली कांच हातांत घेऊन आंत गेली.

चित्रकार आंत एकटाच बसला होता. त्याच्या समोर एक मोठा थोरला लाकडी फलक होता. त्या फलकावर तो कागद लावलेला होता. जवळपास चित्रकलेचें साहित्य पडलें होतें.

चित्रकारानें आपल्या सदऱ्याच्या बाह्या कोपरापर्यंत वर सारलेल्या होत्या. त्याच्या कृश हातांवर केसांची दाट लव असल्याचें जान्हवीला एकदम जाणवलें. हातांत कुंचली घेऊन तो एकाग्रतेनें समोरच्या चित्रकृतीकडे पहात होता. डोक्यांवरचे केस नेहमीप्रमाणें विस्कटलेले होते. त्या केसांच्या कांहीं स्वच्छंदी बटा कपाळावर ओणव्या होऊन डोळ्यांची भेट घेत होत्या. हात मोकळा नसल्यानें चित्रकार आपलें कोपर वर करून ते केस मागें सारण्याचा अधूनमधून प्रयत्न करीत होता.

अद्याप अंधार पडला नव्हता. पण सूर्यास्त होऊन गेला होता आणि अंधाराची चाहूल सर्वत्र जाणवूं लागली होती. जेथें चित्रकार बसला होता तेथें तर उजेड बराच कमी होता.

" दिवा लावून ठेवूं का ? " जान्हवीनें विचारलें.

" दिवा ?" स्वप्नांतून जाग आल्याप्रमाणें चित्रकार उद्गारला, " हो लावा कीं, पण जरूर आहे असें नाहीं."

" म्हणजे, अंधारांत दिसतं वाटतं चित्र काढायला ? "

" चित्र काढतोय् कुठें ? नुसता बघतों आहे. "

बघायला सुद्धां उजेड लागतो कीं नाहीं, असें विचारण्याचें जान्हवीच्या मनांत आलें होतें. पण ती बोलली नाहीं. चित्रकाराशीं बोलतांना तिला फार सकोच वाटायचा. कांहीं तरी अवघडल्यासारखें वाटायचें.

सर्वांशीं मोकळ्या मनानें बोलावें वागावें अशी तिला शिकवणूक होती. तो तिचा स्वभावहि बनून गेला होता. वसुदेवाजवळ बोलतांना तिला कोठलाहि संकोच वाटत नसे. स्वतःचें मन ती मोकळेपणानें त्याच्याजवळ उघडें करी. त्याच्याशीं भांडे, तंडे, त्याची थट्टामस्करीहि करी. पण चित्रकाराच्या बाबतीत हें कांहींच शक्य नव्हतें.

तो स्वतः फार कमी बोलत असे हें तर एक कारण होतेंच; पण तें एकच कारण होतें असें नाहीं. कांहीं माणसें आपल्या उपस्थितीनें आनंद पसरवितात; कांहीं दुःख पसरवितात. चित्रकार आपल्या उपस्थितींतून संकोच पसरवीत असे. दिवा लावला कीं त्याचे किरण चौफेर पसरतात त्याप्रमाणें चित्रकार समोर आला की, तो आपल्या सभोंवार संकोचाचें, निःशब्दतेचें वातावरण निर्माण करीत असे. जान्हवीला वाटलें, स्त्रियांच्या बाबतीत हें अधिक होत असावें. कारण वसुदेवाशी अथवा महंतांशी तो अधिक मोकळेपणानें बोले, हास्यविनोद करी. परंतु जान्हवी जवळ येतांच त्याचे डोळे खालीं वळत, कोठल्या तरी दूरच्या वस्तूचा ते वेध घेऊं लागत.

परंतु एखादे वेळीं त्याचे डोळे या बंधनाचें, या शालीनतेचें उल्लंघन करीत. बोलतां बोलतां तो एकदम अविचल दृष्टीनें तिच्याकडे क्षणभर टक लावून बघे. आपण अन्यत्र बघत असतां चित्रकार आपल्याकडे पहात आहे असें जान्हवीला सारखें वाटायचें !

त्याची नजर नजरेला मिळाली म्हणजे तो कांहीं तरी डोळ्यानें सांगत आहे असें जान्हवीला वाटे. ओंठांप्रमाणें डोळेहि बोलूं शकतात असें तिनें संस्कृत काव्यांत वाचलें होतें; पण त्याचा प्रत्यक्ष अर्थ चित्रकाराच्या डोळ्यांनींच तिला पटवून दिला. कित्येकदां त्याची नजर तिला सहन होत नसे. नेहमींचा लाजरेपणा दूर करून तो जेव्हां तिच्याकडे बघे तेव्हां त्याची ती दृष्टि आपल्या अंगप्रत्यंगाला खुपत आहे, बोचत आहे, असा तिला भास होई.

तिच्यांत एक प्रकारचा उद्धटपणा होता, अतिक्रम होता. अन्नाला कांहीं भावना नसते; पण असती तर भुकेला माणूस जवळ आलेला पाहून अन्नाच्या मनांत जी कांहीं गजबज झाली असती, तशीच गजबज अशा वेळीं जान्हवीच्या मनांत होई.

तो मठांत आल्यापासून हे प्रकार तिला जाणवत होते.

—आदल्या दिवशीं तो बाहेरचें काम आटोपून दुपारच्या उन्हांत मठांत परत आला होता. किती वेळ तरी तो बाहेरच्या बाहेर बसून राहिला. जान्हवीनें आपण होऊन त्याला पाणी वगैरे हवें का म्हणून विचारलें. हवें म्हणतांना त्याला किती संकोच वाटला होता! जान्हवीने तांब्या भांडें भरून त्याला आणून दिलें.

" घरीं कोणीच नाहीं का ?" त्यानें विचारलें.

" मी आहें कीं. "

" दुसरं कोणी नाहीं ?" तो किंचित् हंसून उद्गारला.

त्यानें पुढें होऊन तांब्या भांडें जान्हवीच्या हातांत परत दिलें. तें देतांना त्याच्या हाताचा उष्ण स्पर्श तिच्या बोटांना जाणवला. हें मुद्दाम तर झालें नाहीं ? तिच्या चेहेऱ्यावर एकदम लज्जेची लाली पसरली. तांब्या भांडें आंत ठेवून ती पुन्हां बाहेर आली व म्हणाली, " इकडे आंत बसा कीं, तुम्हांला मीं इथं बसवून ठेवल्याचं बाबांना कळलं तर ते रागावतील माझ्यावर !"

—तिनें पुढें होऊन पर्णगृहाचें दार उघडलें. तिच्या मागोमाग तो आंत आला.तेथील पुस्तक-संग्रहाकडे बोट दाखवून ती म्हणाली " कांहीं वाचायला हवं का ?"

" फार गहन विषयाचे ग्रंथ आहेत ते !"

" तुम्हांला कोणता विषय आवडतो ?"

" सगळेच सुंदर विषय मला आवडतात; अवघड विषय मात्र आवडत नाहींत. " चित्रकार उत्तरला. हे शब्द उच्चारतांना तो स्वत:शींच खालीं पाहून हंसला आणि नंतर जान्हवीकडे टक लावून पाहूं लागला.

जान्हवीला फार ओशाळल्यासारखें झालें; सुंदर विषयांत हे कशाकशाची जमा करीत आहेत? मघाचा तो स्पर्श आणि आतांची ही दृष्टि! त्यांना कांहीं सुचवायचें तर नाहीं ?

कांहीं तरी औपचारिक बोलून तो तेथून निघून गेलो...

हातांत कांच घेऊन आपण खुळ्याप्रमाणें स्तब्ध उभ्या आहोंत याची जान्हवीला जाणीव झाली. किंबहुना चित्रकारानेंच तिला ती जाणीव करून दिली. तो उठून तिच्याजवळ आला व म्हणाला, "मी लावतों दिवा. पाहुण्यानं किती त्रास द्यायचा?"

"इश्श, त्रास कसला त्यांत?"

ती पुढें झाली. पण चित्रकारानें तिला आडविलें. तिच्या हातांतील कांच त्यानें काढून घेतली आणि कोनाड्याजवळ जाऊन दिवा लावला.

"तुम्हांला चित्रं आवडतात की नाहीं?" तो सहज म्हणाला.

चित्रं आवडतात? आपल्या काळजालाच कोणीतरी हात घालीत आहे असें जान्हवीला वाटलें. तिला आपली बालपणाची चित्रकला आठवूं लागली. आपण करीत असलेलीं तीं काळ्या मातीचीं ओबडधोबड चित्रें, महंत व वसुदेव त्यावरून करीत असलेली आपली थट्टा! पूर्वी जर आपल्याला असा एखादा चित्रकार भेटला असता तर आपल्यालाहि अशी चित्रें काढतां आलीं असतीं का? चित्रकाराची कांहीं चित्रें तिनें ओझरती पाहिली होतीं व त्या अस्पष्ट दर्शनानेंहि ती चकित होऊन गेली होती. चित्रकाराला त्याच्या चित्रांविषयी विचारावें, त्याचीं चित्रें पहावींत, समजावून घ्यावीत, चित्रें कशीं काढतात, कोणती साधनसामग्री त्यासाठीं लागते याची माहिती करून घ्यावी असें तिला फार वाटे. पण तिला धीर झाला नाही.

"हो फार आवडतात." ती म्हणाली.

"नुसतीं आवडतात कीं काढतांहि येतात?" चित्रकारानें विचारलें. "वसुदेव मघाशीं म्हणत होते कीं, तुम्हांला चित्रकलेचा फार नाद होता म्हणून."

आपल्या मृत चित्रकलेचा तो उल्लेख ऐकून जान्हवी फार लज्जित झाली. चित्रकाराला हें रहस्य सांगणाऱ्या वसुदेवाचा तिला क्षणभर राग आला. त्यानें चित्रकाराजवळ आपल्या लहानपणाच्या पोरकट चित्राची थट्टा करावी हा विचार तिला असह्य वाटला.

"खरं आहे ना?"

"भलतंच कांहीं तरी! मला कांहींच येत नाहीं!"

"पण पूर्वी काढीत होतां हें खरं ना ?

" काढीत होतें कांहीं तरी—खुळेपणा होता तो."

" आतां कुठें गेला तो खुळेपणा ?

कुठें गेला ? चांदीच्या चाकाचा अन् सोन्याच्या आंसाचा एक रथ आला, त्यांत बसला तो खुळेपणा आणि नमस्कार करून गेला निघून आकाशांत ! काय द्यायचं अशा प्रश्नाचं उत्तर ?

" माणसं नेहमीं लहान रहातात वाटतं ? " ती उद्गारली.

" मोठीं माणस नेहमीं लहानच असतात ! "

" म्हणजे काय ? "

" म्हणजे कसला तरी छंद असणं, त्या छंदावर श्रद्धा असणं हेंच जर लहानपणाच लक्षण असेल तर मोठीं माणसंहि लहानच असतात ! "

" पण मी कुठं आहे मोठी ?"

" म्हणजे लहानच आहांत !" चित्रकार उत्तरला आणि मोठ्यानें हंसू लागला.

" माझ्या चित्रकलेचं जाऊं द्या ! ती गेली बिचारी ! पण तुमच्या चित्रकलेचं काय ?"

" ती आहे अजून बिचारी ! आणि जन्मभर पतिव्रतेप्रमाणें माझ्याजवळ रहायचा बेत दिसतो आहे तिचा."

" तुमचं लग्न झालं आहे का ?" जान्हवीनें एकदम अनवधानानें विचारलें. तोंडांतून ते शब्द बाहेर पडतांच तिनें आपली जीभ चावली. पुरेशा परिचयाचा अधिकार नसतांना, चित्रकाराच्या खाजगी जीवनाची चौकशी करण्याचा वेडेपणा आपण केला असें तिला वाटलें.

परंतु चित्रकाराला मात्र या प्रश्नांत कांहींच अवघड वाटलें नाहीं. तो हंसत उत्तरला, " नाहीं ! झालं नाहीं अन् कधीं होणारहि नाहीं ! कलावंतांनीं लग्न करूं नये असं माझ्या गुरूनं सांगितलं आहे !"

" मग काय करावं ?"

" प्रेम करावं."

" पण प्रेमांतून पुढं लग्नच होत नाहीं का ?" जान्हवी प्रवाहांत सांपडल्याप्रमाणें विचारीत होती.

"प्रेमांतून पुढें फार तर मूल होईल. लग्नच होईल किंवा व्हावं असं नाहीं." चित्रकार पुन्हां पूर्ववत् हंसून चटकन उत्तरला.

जान्हवी क्षणभर निःशब्द झाली. तिला वाटलें, चित्रकाराच्या डोळ्यांत जो अतिक्रम कित्येक वेळीं तरंगत असतो तोच आतां शब्दाचा आकार घेऊन बाहेर पडत आहे. अशा प्रकारचे शब्द कोणींच तिच्याजवळ उच्चारले नव्हते. हें सारं चांगलं नसेल कदाचित्, परंतु तें मनोरंजक होतं, आकर्षक होतं यांत शंका नाहीं. ज्या जगांत ती रहात होती त्यापेक्षां अगदीं वेगळ्या आणि त्यापासून खूप दूर असलेल्या एका जगाच्या चित्रविचित्र वेशीजवळ चित्रकार तिला नेत होता. डोळ्यांतला अतिक्रम शब्दांत उतरला, आतां शब्दांतला....

चित्रकारानें एकदम विषय बदलला. तो म्हणाला, "पहायचीं आहेत का माझीं चित्रं ?"

"होय, बघूं या."

त्यानें आपल्या ट्रंकेंतून सातआठ मोठाले कागद काढले व दिव्याच्या जवळ जाऊन तो म्हणाला, "इथं उजेडांत दिसतील चांगलीं."

जान्हवी एकेक चित्र तन्मयतेनें पाहूं लागली. आकाशांत उडून गेलेली चित्रकला पुन्हां तिच्या डोळ्यांत येऊन बसली. बहुतेक चित्रें निसर्गांतील दृश्यांचीं होतीं. कांहीं पुरुषांचीं होतीं, कांहीं काठल्या शहरांचीं होतीं, कांहीं स्त्रियांचीहि होतीं. विविध रंगांच्या सहाय्यानें कागदावर स्थिर झालेलीं तीं सौंदर्यें व त्या भावना पाहून ती थक्क होऊन गेली.

"आवडलीं का ?" चित्रांचे कागद बाजूला ठेवून चित्रकारानें विचारलें.

"हो " जान्हवी उत्तरली. एकच त्रोटक अक्षर तिनें उच्चारलें खरें. पण असे हजारों शब्द तिला खरोखर उच्चारावयाचे होते. परंतु ती भांबावून गेली होती. चित्रकलेच्या त्या अननुभूत साक्षात्कारानें तिचें मन भारावून गेलें होतें. तो अनुभव आणून देणाऱ्या चित्रकाराविषयीं तिचें अंतःकरण स्नेहादरानें ओथंबून गेलें. कांहीहि न बोलतां ती त्याच्या तोंडाकडे टक लावून पाहूं लागली. जें तिला सांगतां येत नव्हतें तें तिच्या नजरेंतून प्रकट होण्याचा प्रयत्न करीत होतें.

• • •

१

रणकालीच्या उत्तरभागीं पाथरगांव नांवाचें खेडें होतें. पाथरगांवच्या शिवेजवळ रत्ना नांवाचा कोंकणी रहात होता. चरितार्थ चालविण्याचे रत्नाचे उद्योग कांहीं भले नव्हते. त्याच्याजवळ स्वतःचा असा जमिनीचा एक तुकडाहि नव्हता. काम तर पुरेंसें नव्हतेंच. कोणी कंत्राटदारानें जगलांत कूप घेतलें तर वर्षांतून चार महिने काम मिळत असे. या चार महिन्यांच्या कमाई-वर वर्षाची गुजराण करणें सोपें नव्हतें. ही परिस्थिति एका रत्नाचीच होती असें अर्थात् नाहीं. परंतु रत्नाला ती विशेषत्वानें जाणवत असे. त्याच्या घरांत निकामी माणसांची संख्या बरीच होती. म्हातारी आई होती. तिला बाहेर जाऊन काम करतां येत नव्हतें. बापहि दुर्दैवानें जिवंतच होता. आपल्या अफाट व्यवहारामध्यें गुंतलेल्या काळपुरुषाला, जगाच्या एका अज्ञात कोपऱ्यांत पडलेलें हें गलितगात्र व चैतन्यहीन झालेलें शरीर उचलून नेण्याची आठवणच राहिली नव्हती. मागची शाखा याप्रमाणें हयात होती. तशीच पुढची शाखाहि सारी हयात होती. रत्नाला चार मुली आणि दोन मुलें होतीं. थोरली मुलगी बहेना ही विधवा होऊन परत घरीं आली होती. जाणती व वयांत आलेली अशी तेवढीच मुलगी. बहेनाची आई जिवंत नव्हती. ती वारल्यावर रत्नानें दुसरी बायको केली. तिचीं पांच मुलें नऊ वर्षांपासून सहा महिन्यापर्यंत वयाचीं होतीं.

या साऱ्यांना दिवसांतून एकदां तरी खायला घालणें कांहीं सोपें नव्हतें. दुसरी बायको तब्बेतीनें धडधाकट नव्हती. त्यांतहि अंगावरती लहान मुलगा. हें सगळें ध्यानांत घेऊनच रत्नानें बहेनाला घरीं आणलें होतें. ती दुसरा घरोबा करूं शकली असती. तसें करण्याचा तिचा मनोदयहि होता. पण रत्नानें तिला रोखून ठेवलें. तिनेंहि आपलें कर्तव्य ओळखलें व ती बापाकडे आली. रत्नाचा फावल्या वेळांतील उद्योग म्हणजे चोऱ्या करणें हा होता. जवळपासच्या गांवांत जाऊन पिकांची रातोरात कापणी करणें, रात्रीं बरात्रीं रस्त्यानें जाणाऱ्या वाटसरूंना गांठून त्यांची चीजवस्त लुटणें वगैरे उद्योग तो करी. परंतु एवढ्यावरहि भागत नव्हतें. मग पुरवणी म्हणून

बहेनाहि पैसे मिळवूं लागली. बहेना तारुण्यांत आली होती व तिचें स्वरूपहि सावळें पण ठसठशीत व आकर्षक होतें. वेळप्रसंगीं तिला आपलें हें स्वरूपहि श्रमाच्या भरीस घालावें लागे.

परंतु यांतहि लौकरच विघ्न आलें. आठ दिवस कडाक्याचा ताप येऊन रत्ना मरण पावला. या आजाराची बातमी वसुदेवाला लागली तेव्हां तो रत्नाच्या घरीं गेला. करतां येईल तेवढें औषधपाणी केलें, शुश्रुषा केली; परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. वसुदेव औषधपाणी करायला आला म्हणजे बहेना त्याच्याकडे पुतळ्यासारखी डोळे लावून पहात उभी राही व तो सांगे त्याप्रमाणें करी.

रत्ना गेल्यावर वसुदेव म्हणाला, "बहेना, तूं आतां काय करणार?"

"मी इथंच राहणार!"

"इथें राहून निभावेल का?"

"दुसरीकडे जाणं शक्य नाहीं. म्हातारीं माणसं बिछान्याला खिळलीं आहेत. पोरं लहान आहेत. आई तर अपंग आहे!"

"पोटापाण्याचें कसें भागेल?"

"करीन काबाडकष्ट. तुमचे मात्र फार उपकार झाले! महंतबाबांचा आशीर्वाद आमच्या डोक्यावर आहे, आमची काळजी करूं नका!"

बहेनाच्या डोळ्यांतून पाणी खळखळत वहात होतें. तिनें तें पुसण्याचा प्रयत्न केला नाहीं.

बहेनाच्या आश्वासनावर वसुदेवाचा फारसा विश्वास बसला नाहीं. गडावरती आल्यावर त्यानें महंताला ही हकीगत सांगितली. सगळें ऐकून महंत म्हणाले, "बहेना काय करील किंवा करीत असेल याची मला कल्पना आहे."

"काय?"

"ती वेळप्रसंगीं शरीराचा विक्रय करीत असेल व यापुढेंहि अधिक करील!"

वसुदेवाचें अंग शहारून आलें, झोंपडीच्या कोपऱ्यात उभी असलेली सोज्ज्वळ शांत चेहऱ्याची बहेना त्याला आठवली. पाप तिच्या अवळपास फिरकत असेल असें त्यास वाटलें नव्हतें.

"मला शक्य वाटत नाहीं—"

" तेवढेंच अेक शक्य आहे. दुसरं काय करणार ती ? " महंत म्हणाले.

" त्यापेक्षां मरण पत्करणं बरं " वसुदेव उद्‌गारला.

" मरण पत्करणं वा न पत्करणं हें कांहीं माणसाच्या स्वाधीन असत. नाहीं. तें येत नाहीं तोंपर्यंत तरी जगणं आवश्यक असतं."

" हें कसलं जगणं ! "

" बहेना मरत नाहीं हा तिचा मोठेपणाच नाहीं का ? तिनें मनावर घेतलं तर ती सहज मरूं शकेल किंवा घर सोडून दुसरीकडे जाईल. पण भोंवतालचीं आजारी अपंग माणसं तिला जगवायचीं आहेत. त्यांच्यासाठींच ती हें करीत आहे ! "

" मला वाटतं, पापाच्या मार्गानं जाऊन पुण्यहि करूं नये माणसानं ! " वसुदेव म्हणाला.

" शरीरदानांत कसलं पाप आहे ?"

महंतांचा हा प्रश्न ऐकून वसुदेव बुचकळ्यांत पडला.

" पाप नाहीं ?"

" पाप नांवाची कांहीं गोष्ट असलीच तर ती प्रतारणेंत आहे, जुलूम-जबरदस्तींत आहे, आक्रमणांत आहे. तिला इच्छेविरुद्ध शरीरदान करावें लागतें, जी गोष्ट प्रेमानें करायची ती पैशासाठीं करावी लागते हें वाईट; हें पाप आहे परंतु तें बहेनाचें पाप नाहीं. भाकरी महाग करून इतर सर्व गोष्टी स्वस्त करणाऱ्या समाजव्यवस्थेचें तें पाप आहे."

" मग ती करते तें योग्यच आहे ?"

"तिच्या परिस्थितींत तें आवश्यक आहे. आजचं युगच बाजाराचं आहे, क्रयविक्रयाचं आहे. चरितार्थासाठीं प्रत्येकाला कांहीं ना कांहीं विकावं लागतं. कोणी श्रम विकतात, कोणी बुद्धि विकतात, कोणी प्रामाणिकपणाहि विकतात. बहेनासारखी स्त्री आपलं तारुण्य विकते. काय धावगं अथवा वेगळं आहे त्यांत ? बहेना स्वतंत्र आहे. शरीरदानानं ती कोणाची फसवणूक करीत नाहीं. ती गोष्ट तिला आनंददायक वाटणारीहि नव्हे. सभोंवारचीं माणसं वाचविण्यासाठीं जें जवळ आहे त्याची ती विक्री करीत आहे. तें दुःखदायक असूनहि विक्री करीत आहे, हा तिचा भलेपणाच नाहीं का ?"

"मग आपण काय करणार ?" वसुदेव म्हणाला, "तिच्या भलेपणावर भिस्त ठेवून स्वस्थ रहाणार ?"

महंत किंचित हंसून उत्तरले, "सर्वांचं सर्व दुःख आपल्याला दूर करतां येईल असा अहंकार आपण बाळगतां कामा नये. अर्थात् आपण कांहीं तरी करणें जरूर आहे. मी बहेनासाठीं कुठें चांगलं काम आहे का शोधतों. तिच्या भावंडांना रामकृष्ण मिशनच्या अनाथालयांत पाठवून तिचा बोजा कमी केला पाहिजे. तेंहि आपण करूं शकूं. तूर्त घरखर्चासाठीं तिला मदत केली पाहिजे. ती व्यवस्था मी उद्यां करीन !"

चौथ्या दिवशीं महंतांकडून मिळालेली रक्कम घेऊन वसुदेव दुपारी बहेनाकडे गेला. तेथील देखावा बघून तो स्तिमितच झाला. जमातींतील पंचवीस तीस लोक झोंपडीच्या सभोंवार तळ देऊन बसले होते. सर्वांचे चेहरे संतप्त दिसत होते व सगळेजण मोठमोठ्यानें व आवेशानें बोलत होते! बहेनाशिवाय घरांतलीं इतर सारीं माणसेंहि बाहेरच्या घोळक्यांतच होतीं. कांहीं लोकांच्या हातांत कुऱ्हाडी व काठ्याहि होत्या. कोणाची तरी शिकार करायला निघाल्याप्रमाणें सर्वांचा आविर्भाव होता.

वसुदेव जवळ गेला त्या वेळीं कांहीं मंडळी झोंपडीच्या बंद दरवाजावर काठ्यांनीं वार करीत होती. कोणी त्यांना थांबा म्हणत होते, तर कोणी उत्तेजन देत होते.

वसुदेवाच्या आगमनानें सर्वांची नजर त्याच्याकडे वळली. महंतांसंबंधीं तिकडे असलेल्या आदरभावाचा थोडा वारसा आतां वसुदेवासहि मिळूं लागला होता त्याला बघतांच सर्वजण जमावानें उठले व कांहीं तरी ओरडूं लागले.

"काय, झालंय् काय ?" वसुदेवानें विचारलें. एका माणसानें बंद झोपडीकडे बोट दाखविलें.

"कोण आहे आंत ?"

"बहेना !" कोणी तरी उत्तरले.

"मग ? दार बंद कां ?"

"ती बाहेर येत नाहीं! आंतून बंद केलंय् !" सगळेजण बोलूं लागले.

"कशासाठीं ? तुम्ही कां जमलांत इथें ?"

"तिला बाहेर काढायची आहे !—तिला मारायची आहे—"

" मारायची ?" वसुदेव उद्‌गारला.

" होय बाबा, मारलीच पाहिजे कुऱ्हाडीनें." एक म्हातारा म्हणाला. नंतर जमावाकडे वळून तो उद्‌गारला, " बाहेर येत नसेल तर झोपडीच पेटवा. आंतल्या आंत जळून जाईल !"

" पण काय केलं तिनं ?" वसुदेव ओरडला.

" आपला बाप मारला. चेटकीण आहे ती !" सगळेजण उत्तरले.

वसुदेवाच्या ध्यानांत आलें. काय करावें हें त्याला क्षणभर कळेना. या प्रक्षुब्ध जमावाला तो अेकटा कसा शांत करणार ! परंतु धैर्य धरून पुढें पाऊल टाकण्याची वेळ होती ही.

तो जमावाच्या मध्यभागीं गेला व ओरडला, " तुम्ही सारेजण आपा-पल्या घरीं जा—"

" तिला मारल्याशिवाय जाणार नाहीं ! चेटकीण आहे ती ! " अनेकजण गरजले.

" कोणीं सांगितलं हें ?"

" तिनंच माझ्या घरधन्याला मारलं ! रातोरात बाहेर जायची कुठें तरी. तिनंच मारलं ! " रत्नाची दुसरी बायको किंचाळत म्हणाली.

" मी सुद्धां मघल्या रात्रीं तिला अेकदां जगलांत हटकलं होतं." अेकजण म्हणाला.

' चेटकीण ! चेटकीण !' अशा आरोळ्या मारीत पुन्हां सर्वांनीं उचल घेतली व ते झोंपडीकडे धांवले. त्यांच्या हातांतील कुऱ्हाडी बहेनाच्या रक्तासाठीं तहानल्या होत्या.

वसुदेवानें पुढें धांव घेतली. तो दरवाजापाशीं हात पसरून उभा राहिला व म्हणाला, " खबरदार कुणी दरवाजाजवळ याल तर ! "

परंतु तो हे शब्द उच्चारीत असतांच दारांवर अनेक काठ्यांचे व कुऱ्हाडीचे आघात झाले. वसुदेवाच्या अंगावर कांहीं काठ्या बसल्या, कपाळाला अेक वार बसून तेथें जखम झाली व तिच्यांतून रक्त वाहूं लागलें.

तेवढ्यांत मागच्या बाजूनें दार उघडलें व बहेना दारांत येऊन उभी राहिली. तिचा चेहरा पांढराफटक पडला होता. वसुदेवानें मागें वळून तिच्या-कडे नजर टाकली,

" तूं कशाला आलीस ? " तो उद्गारला.

" तुमच्यासाठी ! " बहेना म्हणाली. " मला मारायचं असेल तर मारूं द्या त्यांना. पण तुम्हांला दुखापत व्हायला नको ! "

बहेनाला पहातांच समोरचा जमाव जास्तीच क्रुद्ध झाला. पुढें होऊन ते लोक तिच्यावर हल्ला करूं लागले. वसुदेवानें पाहिलें कीं आतां अल्पावकाशांत या सर्व लोकांच्या डोक्यांत बुद्धीचा व ज्ञानाचा प्रकाश पाडणें शक्य नाहीं. वेगळी कल्पना सुचून तो मोठ्यानें ओरडला.

"तुम्ही रणकाईवरच्या महंताला मानतां का ? "

सर्व लोक स्तब्ध झाले आणि अपेक्षेनें वसुदेवाकडे बघूं लागले. जमावांतील सगळ्या जाणत्या लोकांना त्या नांव संबधीं दरारा वाटत होता.

" महंतबाबांनीं मला इथें पाठवलं आहे ! जे बहेनाच्या अंगावर हात टाकतील त्याच्या कुळाचा नाश झाल्याशिवाय रहाणार नाहीं. महंतांचा शाप आहे असा! " जमावावरती या शब्दांचा परिणाम झाला रणकालीवरच्या महंताचा शाप ही गोष्ट निश्चित धास्ती वाटण्यासारखी होती बहेनासारख्या चेटकिणीच्या उपद्रवापेक्षांहि महंतांच्या रागाची भीति अधिक होती.

" पण ती चेटकीण आहे ! आमचीं पोरबाळं चावून खाईल ! " कोणी तरी पुटपुटले.

" तिचा बंदोबस्त महंतबाबा करणार आहेत–रणकाईला कौल लावून महंतबाबा तिला जरूर तें शासन करतील! तुमचा विश्वास आहे ना त्यांच्यावर? "

" हो हो ! " अनेकजण उद्गारले.

" मग असेच घरीं जा—"

अगोदर एक कोणीतरी जाऊं लागला. मग दुसरा, मग तिसरा..पांच-सहा मिनिटांत तेथें वसुदेव आणि बहेना यांच्याशिवाय कोणीहि तिसरा माणूस उरला नाहीं. तीं दोघें खोपट्यांत परत आलीं.

" तुझ्या घरांतलीं माणसं कुठें गेलीं ? " वसुदेवानें विचारलें.

" तीं कालपासून आपल्या सोयऱ्यांकडे जाऊन राहिलीं आहेत ! त्यांनींच बातमी उठवली ही—" बहेना बोलतांना आपादमस्तक थरथरत होती. डोळे पाण्यानें भरून आले होते. " मीं सर्वांसाठीं जिवाचं एवढं रान केलं. रातोरात जागून रत्नाच्या उशाशीं दिव्यासारखी जळत बसलें ! मी कांहीं असं वेडंवाकडं करीन का ? "

" असं वेडंवाकडं कोणाला करतांहि येत नाहीं बहेना. तूं मनावर घेऊं नकोस तें."

" तुमच्या कपाळाला लागलं आहे—" एकदम वसुदेवाच्या कपाळाला स्पर्श करून बहेना म्हणाली.

" थांबा, मी बांधून टाकतें कपाळ—"

बहेनानें एक पांढऱ्या कापडाची चिंधी फाडली व ती पाण्यांत पिळून नंतर वसुदेवाच्या कपाळाला बांधून टाकली.

" बहेना, तूं आतां काय करणार आहेस ?"

" तुम्हीच सांगा—"

" गडावर चल महंतांकडे—"

" कौल घ्यायला ?"

" नाहीं तिथें रहायला."

बहेना क्षणभर विचार करून नंतर निर्धारानें म्हणाली, " नाहीं, मी येणार नाहीं ! मी गांव सोडून निघून जाईन."

" एकटीच !"

" हो, एकटीच ! मला कांहीं भय वाटत नाहीं ! दुसरं घर करीन मी. रत्नासाठींच जीव अडकला होता इथें !"

वसुदेवानें तिला आणलेले पैसे दिले व तो बाहेर पडूं लागला. तेवढ्यांत बहेना पुढें होऊन म्हणाली, " तुमचे उपकार कसे फेडूं? तुम्ही आलांत म्हणून जिवंत राहिलें मी—"

बोलतां बोलतां खालीं वाकून तिनें वसुदेवाच्या पायाला मिठी मारली.

वसुदेवानें हात देऊन तिला उठवलें. तिच्या सर्वांगाचा त्याच्या अंगाला स्पर्श झाला. त्या क्षणभरांत त्याचें मन मोहवश होऊन गेलें. वाऱ्याची लहर अंगावरून जावी त्याप्रमाणें वासनेची एक प्रबळ लहर त्याच्या अंत:करणास स्पर्श करून गेली !

बहेनाला तें कळलें असावें. आपल्यावर झालेल्या अपार ऋणाची अंशतः फेड करण्याचें साधन आपल्याजवळ आहे या जाणीवेनें तिचा चेहरा क्षणमात्र उजळला. तिनें वसुदेवाच्या गळ्यांत हात घातला व त्याच्या डोळ्याला आपले ओले डोळे लावून ती म्हणाली " जरा वेळ राहतां का ?"

वसुदेव आतां त्या वासनेच्या पाशांतून मुक्त झाला होता. हलकेच तिला दूर सारून तो हंसत म्हणाला, " तूं खरीच चेटकीण दिसते आहेस ! "

" नाहीं ! नाहीं ! " बहेना शरमिंदी होऊन दूर उभी रहात म्हणाली, " तुमची कांहीं सेवा करतां यावी इतक्याच अपेक्षेनें बोलले मी ! "

" माझी कांहींहि सेवा करायची जरूर नाहीं. तुला कधीं कांहीं अडचण आली, संकट आलं तर रणकालीच्या गडावर तुझा भाऊ राहतो आहे हें विसरूं नकोस ! "

● ● ●

वसुदेवानें जान्हवी आणि चित्रकार या दोघांना ही सारी हकीगत सांगितली तेव्हां तिचे परिणाम दोघांवर दोन प्रकारचे झाले. त्याच्या कपाळावरील पट्टीची अवखळपणें थट्टा करणारी जान्हवी एकाएकीं गप्प झाली आणि एरव्ही गप्प असणारा चित्रकार उत्साहानें बोलूं लागला.

वसुदेव आपली हकीगत संपवून म्हणाला, " बहेनासारख्या स्त्रिया अपराधी असल्या तरी मनुष्य जातीचं भवितव्य उजळ करणाऱ्या थोरांच्या वर्गांत त्या जमा होतात असं वाटतं मला—"

" या थोरपणाचं पारितोषिक तुम्हीं काय दिलं तिला ? " चित्रकार स्मित करून म्हणाला.

" पारितोषिक देणारा मी नाहीं. ज्याच्या हातांत ती समर्थता असेल तो देईल ! "

" तुमच्या हातीं फक्त शासन करणं आहे का ? "

" शासन ? कसलं शासन केलं मीं ? " वसुदेव आश्चर्यानें उद्गारला.

" तुम्ही तिला लज्जित करून तिच्या अधोगतीची तिला जाणीव करून दिली "

" म्हणजे काय ? "

" म्हणजे तुम्ही दोघांतील नैतिक अंतर विसरलां नाहींत आणि तिलाहि विसरूं दिलं नाहीं—" चित्रकार उत्तरला.

" हें अंतर खोटं आहे का ? "

" तें खरं आहे असं समजूं. पण मनुष्यजातीचं भवितव्य उजळ करणाऱ्या

माणसांत तिची जमा होत असेल तर, तुम्ही तिच्या श्रद्धांचं रक्षण करायला नको का ? "

" तिच्या श्रद्धेचं रक्षण करणं म्हणजे तिच्या अनुचित सूचनेचा स्वीकार करणं असं तुम्हांला म्हणायचं आहे का ? "

" तिच्या पातळीवर उतरून तुम्ही तिचं थोडंफार समाधान केलं असतं तर स्वतःच्या चांगुलपणावरील तिची निष्ठा अधिक वाढली असती असं मला वाटतं ! जी गोष्ट ती सतत केवळ नाइलाजानें, पैशाच्या प्राप्तीसाठीं, म्हणजेच दुसऱ्याच्या कल्याणासाठीं करीत होती, तीच तिला स्वतःच्या संतोषासाठीं, स्वतःच्या समाधानासाठीं करण्याची संधी मिळाली होती. ही संधि तुम्हीं तिला मिळूं दिली नाहीं. तिच्यावर तुम्हीं केलेल्या ऋणाचा बोजा फार मोठा आहे यांत शंका नाहीं, पण या ऋणाची आपण अंशतः का होईना, परतफेड केली आहे हें समाधान मिळविण्याचा तिला अधिकार नव्हता का ? "

जान्हवी मुकाट्यानें ऐकत होती. स्वभावतः मितभाषी वाटणारा चित्रकार हे विचित्र शब्द मोकळेपणानें उच्चारीत असलेला पाहून तिला मौज वाटली. त्याच्या शब्दांतून सूचित होणाऱ्या अर्थामुळें तिला थोडासा संकोचहि वाटल्याविना राहिला नाही. त्यांच्यांत होणाऱ्या संवादाकडे आपलें लक्ष आहे कीं नाहीं हें ओळखतां येऊं नये अशा आविर्भावानें ती ऐकूं लागली.

चित्रकार पुढें म्हणाला, " बहेनाच्या साऱ्या जीवनाचं चित्र क्षणभर डोळ्यासमोर उभं करा. स्वतःच्या सुखाला त्यांत किती अवसर होता अथवा याहिपुढें राहील ? कांहीं माणसं जगामध्यें अशींच जन्माला येतात कीं, सभोंवतीं असलेल्या माणसांच्या सुखाची सरबराई करण्यांतच त्यांना आपलं सारं जीवन संपवावं लागतं ! हा उद्योग कां म्हणून कोणी विचारील, तर त्याचं उत्तर इतकंच कीं तो त्यांचा स्वभावधर्म असतो. फूल जितक्या स्वाभाविकपणानं उमलतं तितक्याच स्वाभाविकपणानं तीं आपलं जीवन इतरांना वाहून टाकीत असतात. तिथें कसलीहि अपेक्षा नसते. पैशाची नाहीं, सुखाची नाहीं अथवा नांवाचीहि नाहीं. एका माणसानं दुसऱ्या माणसासाठीं खपावं, त्याग करावा, स्वतःच्या सुखाकडे पाठ फिरवून त्याच्या सुखासाठीं

जीव पाखडावा हें मानवी संस्कृतीच्या मुळाशीं असलेलं फार मोठं परंतु फार साधं ध्येय हीं माणसं केवळ स्वभावधर्मानं पत्करीत असतात !' तुमच्याप्रमाणें ती ज्ञानी नसतात, किंवा तुमच्याप्रमाणें तीं संसारांतील काबाड-कष्टांचा त्याग करून उंचावरहि रहात नाहींत. दुःख, दारिद्र्य आणि व्याधी यांच्या चिखलांतच तीं सतत राहतात व तेथेंच आपलं जीवनकार्य शोधतात."

वसुदेव किंचित् हंसून मधेंच म्हणाला, "हें सारं मला मान्य आहे. पण माझ्यावर आरोप कोणता ?"

"दुःखितापेक्षांहि दुःखिताच्या उशाशीं बसून जळत राहणाऱ्या माणसाचं जीवन अधिक उजाड, अधिक भकास असतं. अशा माणसांच्या दाराशीं सुखासमाधानाचा, संतोषाचा एखादा क्षण नेऊन उभा करणं हें मला वाटतं फार महत्कार्य आहे. बहेनाच्या बाबतीत हें कार्य तुम्हांला करतां आलं असतं. चेटकीण म्हणून लोकांच्या कुऱ्हाडीला बळी पडण्याचा हा प्रसंग तिच्या आयुष्यांतील सर्वांत श्रेष्ठ परंतु सर्वांत दुखःदायक प्रसंग होय. या प्रसंगीं तिनें अपेक्षिलेली गोष्ट तिला मिळाली असती तर पुढील साऱ्या आयुष्यांत तो अनुभव तिला प्रकाश देत राहिला असता !"

"बहेनाची बाजू आपण क्षणभर सोडून देऊं," वसुदेव म्हणाला. "माझ्या बाजूनें या प्रश्नाचा जरा विचार करा. तिची सूचना मान्य करणं म्हणजे मी स्वतःचा अधःपात करून घेण्यासारखं नव्हतं का ?"

"यांत कांहीं अधःपात आहे असं मानलं तर ज्या क्षणीं तुमच्या मनांत तिच्याविषयी आसक्ति निर्माण झाली त्याच क्षणी तो झाला होता. परंतु अधःपात उघडया डोळयानं पत्करणं यांत सुद्धां मोठं नैतिक धैर्य लागत नाहीं का ?"

"अनैतिक धैर्य !" वसुदेव उद्गारला.

"नीतीच्या कल्पना स्त्रीपुरुष संबंधाभोंवतीं बांधून ठेवणाऱ्यांनीं अनैतिक धैर्य म्हणावं. मी नैतिकच म्हणतों. माझी नीतीची कल्पना फार व्यापक आहे. नीति म्हणजे जीवनांतील माणुसकीचें आणि सौंदर्याचें रक्षण करणारी नियंत्रणा. तुमची नीति म्हणजे हातांत आसूड घेऊन व्यभिचारांचा, मद्यपानांचा आणि चोरीदरोडयांचा पाठलाग करणारी अेक हिडीस तोंडाची राक्षसी आहे ! लोकांच्या अंतःकरणांतील भीतीवर ती आपला निर्वाह

करीत असते. माझं नीतीचं चित्र वेगळं आहे. माणसांचं जीवन सुखमय व मंगल करणारी लावण्यवती देवता आहे ती. तिच्या प्रवेशासाठीं लोकांनीं आपल्या मनाचीं दारं स्वयंस्फूर्तीनें उघडीं ठेवलीं पाहिजेत. ही नीति बहेना-जवळ होती. तिनें अधःपाताचं भय कधीं बाळगलं नाहीं. तुम्हीं मात्र तें बाळगलं—"

"तुम्ही म्हणतां तितकी आमची नीतीची कल्पना वेगळी नाहीं." वसुदेव म्हणाला. "नीतीला सुंदर स्त्रीची उपमा देण्यांत स्त्रीविषयींची शारीरिक आसक्तीच व्यक्त होत नाहीं का ?"

"मग त्यांत काय बिघडलं ? शारीरिक आसक्तींत कांहीं लज्जास्पदता आहे असं मानायला परंपरेशिवाय दुसरा कोणता आधार आहे ?"

"शरीराला शरण जाणं हें लज्जास्पदच आहे !" वसुदेव उद्गारला.

"शरीराला शरण गेला नाहीं असा कोणी महात्मा जन्माला आला आहे का? आणि मी म्हणतों, शरण जाणं, विजय विळवणं, पराभूत होणं ही युद्धाची भाषा या बाबतींत हवीच कशाला? अगोदर शरीर आणि मन यांच्यांत लढाई चालू आहे अशी कल्पना करायची, व मग त्या काल्पनिक लढाईत एक पक्ष घेऊन स्वतःला धीर देण्यासाठीं या युद्धाच्या घोषणा करायच्या हा निवळ अव्यापारेषुव्यापार नाहीं का ? कांहीं युद्ध नाहीं, महायुद्ध नाहीं, संग्राम नाहीं ! ज्या नैसर्गिक गरजा आहेत त्या नैसर्गिक रीतीनं भागवणं हेंच माणसाच्या हिताचं आहे, आणि समाजाच्याहि. जेवण करणं म्हणजे पोटाला शरण जाणं आहे का ? सुंदर देखावा पहाणें म्हणजे डोळ्याला शरण जाणं समजायचं काय ? ही सारी मनोवृत्ति, मला वाटतं, जीवना-विषयींच्या भीतीमधून, एका प्रकारच्या पराभूत भावनेंतून निर्माण झाली आहे. जीवनाचा सर्वांगानं उपभोग घेणं, तें अधिक सुखी व समृद्ध करणं यांतच मानवी जीविताचं सार्थक आहे !"

"बहेनानं जीवनाचा उपभोग घेतला का ?" वसुदेव चित्रकाराला अडवून म्हणाला, "तिचा त्याग मोठा आहे हें तर तुम्ही मानतां ना ?"

चित्रकार आवेशानें उत्तरला, "तिचा त्याग फार मोठा आहे यांत शंकाच नाहीं. ज्यांच्या त्यागाच्या तुतान्या सर्वत्र वाजत असतात अशा अनेकांपेक्षां बहेनासारख्यांची भलाई मोठी असते. पण म्हणून मीं म्हटलं तें खोटं ठरत

नाहीं ! किंबहुना बहेनाचं मत-तें अर्थात् तिला सांगतां येणार नाहीं—माझ्या मताहून वेगळं असणं शक्य नाहीं. इतरांना जीवनाचा उपभोग घेतां यावा म्हणूनच ती स्वतःच्या जीवनाचं समर्पण करीत राहिली ना ? म्हणजे जीवनाचा उपभोग घेणं हेंच तिचंहि साध्य आहे. आत्मसमर्पण हा केवळ तें प्राप्त करवून घेण्याचा मार्ग झाला. आत्मसमर्पणांतील महात्मता मी मानतों, परंतु तें कांहीं मानवी आयुष्याचं अखेरचं उद्दिष्ट ठरत नाहीं. अखेरतः अशी परिस्थिति निर्माण व्हायला हवी कीं जेव्हां कोणालाहि त्याग करण्याची जरुरीच राहणार नाहीं. त्या आदर्श जगांत बहेनाहि निर्माण होणार नाहींत आणि रणकालीवरचे महंत व वसुदेवहि निर्माण होणार नाहींत !"

वसुदेव म्हणाला, "बहेना निर्माण होणार नाहींत हें खरं असेल, पण रणकालीच्या महंतांसंबंधीं मात्र असं म्हणतां येणार नाहीं. कारण जीवनाचा सर्वांगानं उपभोग घेणं हें कांहीं त्यांचं साध्य नव्हे ! मानवी जीवन मातींतून प्रकट होतं आणि मातीला मिळतं हें खरं. पण मधल्या या व्यक्तमध्य अवस्थेंत त्याला तेजाचे पंख फुटतात आणि या पंखांच्या बळावर तें आकाशांत जाऊन विश्वांतील आदिशक्तीच्या पायाशीं लीन होऊं शकतं ! महंतांचं जीवनसाध्य हें आहे. जीवनाचा सर्वांगानं उपभोग घेणं हें नव्हे. कर्दमांत वळवळणारे कीटकहि जीवनाचा सर्वांगानं उपभोग घेत असतात. बुद्धीची अमोल देणगी घेऊन जगांत येणाऱ्या माणसानं तें करण्यांत विशेष गौरवाचें काय आहे ?"

"कीटकांचं ध्येय माणसानं आपल्या डोळ्यासमोर ठेवण्यांत कोणता कमीपणा आहे?" चित्रकार म्हणाला, "आणि शिवाय कीटकाचा जीवनोपभोग आणि माणसाचा जीवनोपभोग यांत फार मोठा फरक आहे ! हा फरक बुद्धीमुळें पडतो. मी सूर्यास्ताचा देखावा पाहून हर्षभरित होतों, शाकुंतल वाचून आनंदित होतों, आगगाडीच्या प्रवासांतील सुख मी मिळवूं शकतों. म्हणूनच कीटकांपेक्षां माणसाचा जीवनोपभोग अधिक व्यापक आहे, अधिक आनंददायक आहे. आपल्या आनंदाचीं व सुखाचीं साधनं त्यानं सतत वाढविलीं आहेत. आदिशक्तीच्या चरणाविषयीं मला फारशी माहिती नाहीं, परंतु मानवी संसार सर्वतोपरी सुखपूर्ण करण्याकडे बुद्धीचा उपयोग झाला तरी तिचं कार्य झालं असं मी समजतों. नव्हे, तेंच तिचं कार्य आहे !"

" आमच्या संस्कृतीनं तसं मानलं नाहीं ! आणि मानलं नाहीं म्हणूनच ती जगाच्या अग्रभागीं आहे व सदा राहील ! " वसुदेव उद्‌गारला.

"तुमची संस्कृति! अन्नाची परीक्षा तें खाऊन होतें, स्वयंपाकी काय मजलेदार गोष्टी सांगतो यावर नव्हे ! तुमच्या संस्कृतीनं कोणत्या जीवनाचा वारसा तुम्हांला दिला यावरतीच तिच्या बरेवाईटपणाची कसोटी आहे ! बहिष्काराच्या हजारों भिंती उभ्या करून परलोकाकडे तोंड करून उभी राहिलेली ही तुमची संस्कृति !—महारवाडे, चांभारवाडे उभे करणारी, स्त्रियांचे पशू करणारी, मंत्रतंत्राच्या चरकांत माणसाची प्रज्ञा मारून टाकणारी ही संस्कृति–तुम्ही अंधपणानें तिच्यापुढें कितीहि धूप जाळलांत तरी सगळं जग तिच्या दर्शनानं मुग्ध होईल असं मानूं नका. आकाशांत डोकं घालणाऱ्या या संस्कृतीनं आकाशांतलं तर कांहींच मिळवलं नाहीं, पण आपल्या पायापाशीं जमिनीवर मात्र अन्याय, जुलूम, ढोंग, अप्रामाणिकपणा आणि निर्बुद्धपणा यांचा मनसोक्त चिखल माजवून ठेवला आहे."

चित्रकाराचीं सारींच मतें वसुदेवास स्वीकारार्ह वाटत नव्हतीं. परंतु त्याचा आवेश, त्याची तळमळ पाहून त्याच्याविषयींचा त्याचा स्नेहभाव वाढला मात्र. कोणत्याहि निष्ठेच्या आधारें का होईना, जीवनाकडे इतक्या अगत्यानें पहाणारीं माणसें फार विरळाच असतात. चित्रकाराच्या आविर्भावांत आवेश होता, पण कटुता नव्हती. बोलण्यांत ठिणग्या उडत होत्या, परंतु त्यासाठीं, त्याच्या अंतरांतील सुजनताच ऐरणीवर घातलेली आहे असा भास होई. चित्रकार वयानें वसुदेवापेक्षांहि थोडासा लहानच असावा. त्याच्या तरतरीत व देखण्या मुद्रेवर बोलतांना आरक्तता पसरली होती आणि एरव्हीं उदासीन दिसणाऱ्या डोळ्यांत तेजस्विता होती. वसुदेवानें सहज जान्हवीकडे नजर टाकली.

ती चित्रकाराकडे टक लावून बघत होती आणि त्याच्या तोंडांतून निघणारा प्रत्येक शब्द आतुरतेनें ऐकत होती. वसुदेवाची नजर आपल्याकडे वळली आहे हें लक्षांत येतांच ती गडबडली, लाजली व कांहींतरी निमित्त काढून तेथून निघून गेली !

वसुदेव हंसून म्हणाला, " पहा, तुमचे विचार सहन न झाल्यामुळें जान्हवी निघून गेली ! "

जान्हवीचें आकस्मिक जाणें चित्रकारासहि चमत्कारिक वाटलें. सहसा न बोलणाऱ्या माणसाला, कोठल्या तरी आवेगांत अधिक बोलून गेल्याबद्दल नंतर वाटणारा संकोच त्याला वाटूं लागला. तो अेकदम गप्प झाला. चारी बाजूंना ये जा करणाऱ्या मुंग्या कसल्या तरी आघातामुळें अेकदम वारुळांत शिराव्या त्याप्रमाणें त्याचे सारे शब्द कोठें तरी विरून गेले. नेहमीच्या भिडस्तपणानें त्याला आपल्या विळख्यामध्यें ओढून घेतलें.

● ● ●

जान्हवी पुन्हा जरा वेळानें पर्णगृहांत आली तेव्हां चित्रकार एकटाच कांहींतरी चित्र समोर घेऊन बसला होता.

जान्हवीची चाहूल लागतांच त्यानें हातांतील साहित्य बाजूला ठेवलें व तो जान्हवीकडे पाहूं लागला.

"कां, एकदम चित्र काढणं बंद केलं ?" जान्हवीनें विचारलें.

"या डोंगरावर आतां यापुढें चित्र काढणं जमेल असं कांहीं वाटत नाहीं." चित्रकार उत्तरला.

"कारण ? दोनचार दिवसांत सारे विषय संपून गेले ?"

"विषय अनंत आहेत. पण ज्या डोळ्यांनीं ते बघायचे ते डोळे मोकळे नाहींत !"

"म्हणजे—"

"त्या डोळ्यांत एक वेगळाच विषय येऊन बसला आहे. चित्र काढायला कुंचली घेतली कीं, तोच विषय समोर येऊन उभा राहतो !"

"मग आतां काय करणार ?" जान्हवी कांहीं कळत नसल्याचा बहाणा करून म्हणाली.

"आतां एकच मार्ग आहे !"

"कोणता ?"

"येथून निघून जाणं हा !"

कांहींतरी आघात झाल्याप्रमाणें जान्हवी एकदम क्षणभर गप्प झाली. तिचा चेहरा गोरामोरा झाला.

नंतर बळेंच हॉंसल्यासारखें करून तिनें विचारलें, "केव्हां जाणार ?"

"आजच संध्याकाळीं गड उतरावा म्हणतों–स्वामीजी परत आले म्हणजे—"

"कुठं जाणार तुम्ही ?"

"माझ्या गांवीं." चित्रकार सहजतेनें उत्तरला.

"कोणतं गांव तें ?"

"पुण्यास राहतों मी."

"इथून खूप खूप दूर असेल नाहीं ?"

"होय, फार दूर आहे—"

"क्षितिजावरती लांबवर डोंगरांची रांग दिसते, त्याच्याहि पलीकडे ?"

"होय, त्याच्याहि पलीकडे !"

"ठीक, मग तुम्ही गेलांत म्हणजे त्या डोंगरांच्या रांगेकडे बघत राहीन मी अधूनमधून !" जान्हवी म्हणाली.

"कां बरं ?"

"कांहीं नाहीं !" जान्हवी दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकून घेऊन म्हणाली, "काहींतरी बोललें मी !...पण आज कांहीं जायचं नाहीं !"

"आज काय आहे ?"

"कारण कांहीं मला चांगलं सांगतां यायचं नाहीं ! पण हवंच असलं तर एक आहे !"

"कोणतं ?" चित्रकारानें विचारलें.

"बाबांचं एक चित्र काढायला घ्या, आणि तें पुरं झालं म्हणजे जा—" जान्हवी उत्तरली.

"तें काढणारच आहें मी; पण इथें नव्हे."

"मग कुठे ?"

"घरीं गेल्यावर !"

"असं काढतां येतं ?"

"हो !"

"मग आणखी कुणाचं काढणार आहांत काय ?" जान्हवीनें विचारलें.

"होय. जान्हवी नांवाच्या एका मुलीचं !"

जान्हवी हंसून म्हणाली " गरीब बिचारी मुलगी ती ! तिचं चित्र काढून काय करणार ? "

चित्रकार एकदम पुढें आला. जान्हवीचा हात आपल्या हातांत ओढून घेऊन तो म्हणाला, ' त्या चित्राला एक सुंदर, सोनेरी चौकट घालणार आणि माझ्या चित्रमंदिरांत तें भिंतीवर मध्यभागीं लावून देणार ! "

जान्हवी दूर होण्याची धडपड करीत असतांच, चित्रकारानें तिला आपल्या बाहुपाशांत घेतलें व हृदयाशीं कवटाळून तिच्या मुखाचीं अधीरपणानें चुंबनें घेतलीं.

आणि त्याच वेळीं पर्णगृहाचें दार उघडलें गेलें आणि महंतांची भव्य, धिप्पाड आकृति, अकालीं आलेल्या एखाद्या कृष्णमेघाप्रमाणें उंबरठ्यावर उभी राहिली.

जान्हवी चटकन् चित्रकाराच्या बाहुपाशांतून बाहेर पडली व आंतल्या घराकडे गेली. जातांना डोळे उचलून महंतांकडे पहाण्याचा तिला धीर झाला नाहीं.

● ● ●

# १०

त्या रात्रीं, मध्यरात्र उलटून गेली तरी जान्हवीला झोंप येईना. नाना प्रकारच्या विचारांचें काहूर तिच्या मस्तकांत माजलें होतें.

आतांपर्यंत शांतपणें वहात असलेला तिचा जीवनप्रवाह एकाएकीं प्रक्षुब्ध होऊं लागला होता. आजच्या संध्याकाळच्या प्रसंगानें तर तिचें तें संथ व सुव्यवस्थित जीवन विस्कळित करून टाकलें होतें, उधळून दिलें होतें.

चित्रकारानें तिच्या शरीराभोंवतीं घातलेला हातांचा विळखा अद्याप तिच्या अंगाला जाणवत होता; त्याच्या उष्ण, अधीर ओंठांचा स्पर्श अद्याप-पहि तिच्या ओठांवर व गालांवर रेंगाळून राहिला होता. जड झालेल्या पापण्या खालीं पडूं लागतांच, त्या अनुभवाच्या आठवणीनें तिचें सर्वांग अचानक पुलकित होई आणि उगाच कावरीबावरी होऊन ती आपला पदर

घट्ट लपेटून घेई. जणूं, त्या पदराखालीं तिला कोणत्या तरी पवित्र गोष्टीचें रक्षण करावयाचें होतें !

चित्रकारासंबंधीं तिच्या भावना नक्की काय होत्या कोणास ठाऊक, परंतु या प्रसंगाची तिनें अपेक्षा के ी नव्हती. बालपणापासून ती ज्या वातावरणांत वाढली होती, त्यांत अशा गोष्टींची अपेक्षा करणें हेंहि अनुचित गणलें जात होतें. लग्न झालें होतें, पण तें केवळ नांवापुरतें. वडलांकडे असतांना, दुःख आणि दारिद्र्य यांचा इतका दाट वेढा घराला पडला होता कीं त्याच्या-पलीकडे नजर पोहोंचविणें तिला कधीहि शक्यच नव्हतें. महंतांच्या मठांत आल्यावर तिचें जीवन सुखपूर्ण झालें, डोंगरपठाराव ील वाऱ्याप्रमाणेंच तिच्या मनोवृत्ति मुक्त झाल्या. परंतु येथेंहि सभोंवार जें वातावरण होतें त्यांत अशा विचारांना वा कल्पनांना अवकाश नव्हता. देवालयाच्या गाभा-ऱ्यांत वस्ती करण्याप्रमाणें होतें तें. तेथें आनंद होता, समाधान होतें, मोकळे-पणा होता. परंतु या सर्वांवर धार्मिक भावनेचीं निरांजनें आपला मंद प्रकाश पसरीत होतीं. धुपाचा परिमळ त्यांत भरून राहिला होता नव्यानें विकसित होणारें तिचें यौवन केव्हां केव्हां या बंधनांचा भेद करून बाहेर पडण्याचा प्रयत्न करी यांत शंका नाहीं. वसुदेवाजवळ बोलतांना केलेला अतिक्रम तिच्या मनाला अद्यापहि जाळीत होता. परंतु या गोष्टी पश्चात्तापाला योग्य अशा होत्या याबद्दलहि तिला शंका नसे.

परंतु आज पश्चात्तापहि वाटत नव्हता. आपण कांहीं तरी गमावून बसलों. यापेक्षां, आपण कांहींतरी मिळविलें अशीच वृत्ति तिच्या मनामध्यें वारंवार डोकें वर काढीत होती. ज्या गोष्टीभोंवतीं भीतीचें व तिरस्काराचें अक्राळ-विक्राळ कुंपण घालण्यांत आलें होतें, त्या गोष्टीपर्यंत ती जाऊन पोहोंचली होती. आणि आश्चर्य असें कीं, विक्राळता होती ती त्या कुंपणामध्येंच, त्यांत असलेल्या त्या गोष्टीमध्यें नव्हे ! तिच्यांत एका अलौकिक सुखाचा रस मात्र रसरसत होता. पूर्वीं सूर्यास्ताच्या देखाव्याकडे डोंगरकडयावरून पाहतांना तिच्या मनांत नेहमीं कल्पना येई कीं, असंच क्षितिजापर्यंत जावं आणि दैदीप्यमान् रंगांच्या त्या उद्रेकामध्यें विलीन व्हावं ! तो विलक्षण प्रवास करून आपण आतां पुन्हा माघारीं आलों आहोंत असें आतां तिला वाटत होतें.

कदाचित् घडलें तें खरोखरीं अनुचित असेल, ज्या सुखाचा आपल्याला

अधिकार नाहीं तें आपण आपल्याकडे ओढून घेतलें असेल. परंतु अनधिकारानें घेतलेलें सुखहि सुखच असतें !

शिवाय चित्रकाराचे ते उद्गार-जीवनाचा सर्वांगानं उपभोग घेणं यांतच मानवी जीवनाची कृतार्थता आहे...

कीं केवळ अनुचिताच्या समर्थनासाठीं या तत्त्वज्ञानाचा आपण आधार घेत आहोंत ?... तिच्या मनावरचे सारे पूर्वसंस्कार केव्हां केव्हां उफाळून वरती येत आणि आपल्या तीक्ष्ण अंकुशांचे तिच्या मनावरती प्रहार करीत.

विचारांची ही गर्दी चुकवून, केव्हां तरी तिचें मन निद्रेमध्यें प्रवेश करी. परंतु त्या अर्धवट झोंपेंत आभास आणि स्वप्नें यांशिवाय दुसरें कांहींच नव्हतें.

असेंच एक विचित्र स्वप्न तिला पडूं लागलें—

समुद्रकाठीं एका बंदरांत उभी होती ती. त्या बंदराची व समुद्राची स्वामिनी तीच होती. समुद्राच्या अफाट, निळ्या विस्ताराकडे ती पहात असतां एक रुपेरी वर्णाचें गलबत बंदराकडे येऊं लागलें. चहूंकडे घंटांचे, शिंगांचे आवाज दुमदुमले आणि तें जहाज तिच्या अगदीं जवळ येऊन उभें राहिलें. चांदण्याचे धागे विणून त्या अद्‌भुत जहाजाचीं उंच शिडें तयार केलीं असावींत. कोठल्या गंधर्वलोकांतून तें आलें होतें कुणास ठाऊक ! त्या जहाजामध्यें ज्या वस्तूंचें भांडार भरलें होतें त्या या लोकांतील खास नव्हत्या. जहाज थांबतांच, निळे, जांभळे, सोनेरी पंख असलेलीं अनेक पांखरें त्यांतून बाहेर पडलीं व जहाजामधील मूल्यवान चिजा आपल्या चोचींत धरून तिच्यासमोर आणून टाकूं लागलीं. पायाशीं पडलेल्या त्या राशींत, कधीं न पाहिलेल्या, चित्रविचित्र रंगाच्या वस्तू होत्या. त्यांचे आकार अनेक आणि तेज डोळ्याला बांधून ठेवणारें होतें. जणूं एखादें इंद्रधनुष्य शतशः मोडून त्याच्या तुकड्यांचीच येथें रास घातली होती ! त्या राशीला स्पर्श करण्यासाठीं ती खालीं वांकणार तोंच तिच्यांतून निखाऱ्याप्रमाणें जळजळीत असलेले दोन डोळे वरती आले. कुणाचे डोळे हे ?

जान्हवी एकदम घाबरून जागी झाली. दिसला तो देखावा स्वप्नांतीलच होता या विचारानें तिला जरा दिलासा दिला. तिनें उठून कोनाड्यांतील समई पेटविली. बाहेरच्या माणसांना त्रास होऊं नये म्हणून तिनें खोलीचा

दरवाजा घट्ट लावून घेतला. मनाची अस्वस्थता कमी करण्यासाठीं जवळ पडलेलें एक पुस्तक तिनें उचललें व तें ती वाचावयाचा प्रयत्न करूं लागली. परंतु वाचणेंहि जमेना. डोळे अक्षरांवरून फिरत होते, पण त्या अक्षरांतील अर्थ मनापर्यंत पोहोंचत नव्हता. स्वतःस संमत असलेल्या विषयाखेरीज दुसऱ्या कोणत्याहि विषयाचें ग्रहण करायचें नाहीं असाच जणूं तिच्या मनानें संकल्प केला होता.

तिनें पुस्तक दूर ठेविलें व दिवा मालवला. झोंप येणें अशक्य होतें. मागील बाजूस असलेल्या खिडकीची फळी तिनें उघडली व ती बाहेर पाहूं लागली.

बाहेर सर्वत्र पांढरें शुभ्र चांदणें पडलें होतें. त्या डोंगरपठारावर एरव्हीं सुद्धां नेहमींच शांत असावयाचें. आता तर मध्यरात्र उलटून उत्तर रात्रीचा प्रारंभ झाला होता. एखादें फळ कांपून त्याचा अगदीं आंतील सोलीव गाभा समोर ठेवावा त्याप्रमाणें शांततेनें आपलें अत्यंत गहन व उत्कट स्वरूप त्या पठारावर खुलें केलें होतें. ती नीरवता, अचलता पाहून जगांत जीवनाचा प्रारंभ झाला आहे की नाहीं कुणास ठाऊक अशी शङ्का यावी. या गाढ शान्ततेवर आकाशामधून चांदण्याचा अभिषेक होत होता. दूरवर दिसणारे डोंगरकडे, पठारावरील झाडें–झुडपें, जवळपासचे लहान मोठे खडक–सर्व जग जणूं चांदण्याच्या रुपेरी प्रकाशामध्यें कोणत्या तरी गहन विषयाचें एकाग्रतेनें चिंतन करीत होतें. क्वचित् एखादी वाऱ्याची अवखळ झुळुक येई व हा शांततेचा गाढ पडदा थोडासा बाजूला सारून तशीच लगबगीनें पुन्हां निघून जाई. तो शांत, रम्य देखावा पाहून जान्हवीला पुष्कळ बरें वाटलें. किती वेळ तरी पूर्वाकाशांत उतरलेल्या त्या चंद्राकडे ती टक लावून बघत होती. विधात्याच्या अंतःकरणांतील प्रेम, दया, करुणा यांसारख्या कोमल व उदार भावनाच चंद्राच्या रूपानें साकार होऊन आकाशांत तरंगत आहेत असें तिला वाटलें.

तिच्या मनावरील विचारांचें ओझें कमी झालें. खिडकी बंद करून ती पुन्हां अंथरुणावर जाऊन पडली.

आपल्याला केव्हां झोंप लागली तें तिला समजलेंहि नाहीं. जणूं चंद्रावरचे कोणी देवदूत खालीं आले व तिला न कळत तिच्या पापण्या मिटवून चोरपावलांनीं पुन्हां परत गेले.

पहांटच्या सुमारास जान्हवीला अचानक जाग आली. कसला तरी आवाज झाला होता खोलींत. अंथरुणावर पडल्या पडल्या ती समोरच्या काळोखाकडे पाहूं लागली. चन्द्र मावळून गेला होता. सर्वत्र घनदाट अंधार भरून राहिला होता. या अंधारांत कांहींच दिसणें शक्य नव्हतें. पुन्हां एकदां आवाज झाला. आवाज दरवाजाचा आहे हें तिनें आतां चटकन ओळखलें. कोणीतरी हलक्या हातानें दार उघडून आंत येत होतें

तिची छाती वेगानें धडधडूं लागली. शरीर थरथरायला लागलें. काय करावें हेंहि तिला समजेना. विस्फारित डोळ्यांनीं ती त्या काळोखाच्या भिंतीकडे बघत राहिली. तिला दिसत नव्हतें, पण तिचें सारें शरीर नजरेची उणीव भरून काढण्याची पराकाष्ठा करीत होतें.

चोरून टाकलेलीं पावलें पुढें पडत होतीं. दाबलेला श्वासोच्छ्वास जवळ जवळ सरकत होता. परंतु येणाऱ्याच्या मनाचा ठाम निर्धार होत नव्हता. अनिश्चयाच्या लाटांवर त्याचें मन हेलकावत असावें. त्याची हालचाल क्षणभर स्थिरावे, क्षणात पुन्हां सुरू होई.

शेवटीं काळोखाच्या आवरणांत लपलेली ती व्यक्ति जवळ, अगदीं जवळ आली. जान्हवी बेभान होऊं लागली. आपली शुद्ध हरपते कीं काय असें तिला वाटलें. कांहींहि करण्याचें किंवा उठण्याचें त्राण तिच्यांत उरलें नव्हतें.

आलेल्या माणसानें क्षणभर थांबून आपला होत जान्हवीच्या अंगावर ठेवला. जान्हवीचें गेलेलें बळ त्या स्पर्शानें परत आलें. तिच्या शरीरांतील सारें जीवन एकवटून उसळून उठलें. हें कोण आहे ? चित्रकार ? कीं—वसुदेव, कीं—

काळोखाबरोबर प्रेम करण्यास तिची तयारी नव्हती. ती एकदम आवेगानें बिछान्यावर उठून बसली व हलक्या आवाजांत उद्गारली "कोण ?"

तिच्या अंगावरील हात झटकन मागें गेला. झुडुपांतून बाहेर आलेला नाग कोणाची चाहूल लागतांच विद्युत् वेगानें पुन्हां झुडुपांत जावा त्याप्रमाणें तो हात निमिषमात्रांत एक झटका घेऊन दूर झाला.

जान्हवी आपल्या प्रश्नाच्या उत्तरासाठीं थांबली. पण तिला तें मिळालें नाहीं. येणाऱ्याचीं पावलें पुन्हां दाराच्या दिशेनें पडूं लागलीं. दाराची करकर झाली व दार लोटलें गेलें. दाराचा आवाज होऊं नये याचीहि दक्षता जाणा-

ऱ्यानें फारशी घेतली नाहीं. त्याच्या मनांतील आवेग व पराभवाची भावना दाराच्या त्या आवाजांतून प्रतीत झाली !

जान्हवी पुन्हां त्या अभेद्य काळोखांत एकटी राहिली. परंतु आतां झोंप येणें तर सर्वस्वीं अशक्य होतें. तिच्या केवळ शरीरास नव्हे, तर तिच्या अवघ्या स्त्रीत्वाला, तिच्या साऱ्या जीवनाला कोणीतरी स्पर्श केला होता. हा हात कोणाचा हें तिला जाणून घ्यावयाचें होतें.

तिनें कंदील लावला व तो हातांत घेऊन ती बाहेर पडली. बाहेरच्या दालनांत वसुदेव व चित्रकार दोघेहि आपापल्या जागीं गाढ झोंपीं गेलेले होते. कंदिलाच्या प्रकाशामुळें किंवा तिच्या पायरवामुळेंहि त्यांची झोंप सोडली नाही.

मग कोण आलं होतं ? जी भयंकर शंका निखाऱ्याप्रमाणें तिच्या मनाला जाळता स्पर्श करून गेली होती तीच खरी होती का ?

या शंकेचेंहि निरसन करून घेण्याचें तिनें ठरविलें. पलीकडे असलेल्या पर्णगृहाकडे ती गेली. तिचें सारें शरीर कांपत होतें. हातांतील कंदील थड-थडत होता.

पर्णगृहाचें दार तिनें लोटलें. तें आंतून बन्द नव्हतें. सारें धैर्य एकवटून तिनें दार उघडलें आणि आंत पाऊल टाकलें.

आंत कोणीहि नव्हतें. व्याघ्राजिनानें आच्छादलेला महंतांचा बिछाना मोकळा पडला होता! जान्हवीचें भान हरपलें. हातांतील कंदील तिनें बाजूला फेंकून दिला आणि त्या व्याघ्राजिनावर धाडकन् अंग टाकून ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली.

कंदिलाची काच फुटून तिचे लहान लहान तुकडे जमीनीवर पसरले. कंदील कलंडला होता. आणि त्या कलंडलेल्या स्थितींतहि त्याची वात भांबावल्याप्रमाणें होऊन वेडीवाकडी जळत होती.



# ११

दुसऱ्या दिवशीं जान्हवी सकाळीं उठली, तेव्हां सूर्याचा प्रकाश जखमी झालेल्या माणसाप्रमाणें जडपणानें पृथ्वीवर पडलेला होता. त्याच्यांतील नेहमींचें चैतन्य हरपलें होतें, नेहमींचा उल्हास ओसरून गेला होता. साऱ्या वातावरणामध्यें कोठला तरी सुन्नपणा, मंदपणा तरंगत होता. जणूं जान्हवी-प्रमाणें काल रात्रीं रणकालीवरच्या त्या आकाशासहि झोंप मिळाली नव्हती. सुन्न होऊन तारवटलेल्या डोळयांनीं तें आकाश जान्हवीकडे पहात होतें !

जान्हवी आपलीं नित्याचीं कामें करीत होती. परंतु तीं केवळ यांत्रिक-पणानें; त्यांत तिचें मन नव्हतें. सकाळीं तिनें सडासंमार्जन केलें, झाडांना वेलींना पाणी घातलें, तळयावर जाऊन नेहमींप्रमाणें ठराविक वेळीं स्नान केलें, स्वयंपाकाचीहि सिद्धता केली. परंतु या सगळया गोष्टी तिच्या हातून अेखाद्या कळसूत्री बाहुलीप्रमाणें होत होत्या.

तिच्या वागण्यांतील, हालचालींतील हा जडपणा वसुदेवाच्या लक्षांत आलासुद्धां. त्यानें अेकदां तिला विचारलें, " कां ? आज जरा थकलेली दिसतेस ? "

" छे. भलतंच ! " जान्हवी उगाच हंसून उत्तरली

" काल रात्रीं चांगली झोंप नाहीं आली ? "

" आली कीं ! न यायला काय झालं ? " तिनें वसुदेवाकडे अेकदां पाहिलें. त्याला कांहींहि माहीत असल्याचें चिन्ह त्याच्या चर्येवर दिसत नव्हतें.

" प्रकृति चांगली आहे ना ? "

" छान आहे कीं ! हें भलतंच काय विचारतां आहांत आज ? "

वसुदेवास वाटलें, आपला गैरसमज झाला. ती गोष्ट त्यानें तिथेंच सोडून दिली.

वसुदेव जाऊं लागला. तेवढयांत त्याच्या कानांवर जान्हवीची हांक आली. तो आश्चर्यचकित होऊन एकदम मागें वळला. जान्हवी भिंतीला रोखून खालीं पहात होती.

" काय म्हणालीस ? मला हांक मारलीस का ? "

" हो."

" कांहीं सांगायचं आहे ? " क्षणभर वाट पाहून वसुदेवानें विचारलें.

" मला फार भीति वाटते आहे!" न सांगण्यासारखी गोष्ट आपण सांगतों आहोंत अशा संकोचभावानें जान्हवी म्हणाली.

" भीति ? कशाची भीति ? " वसुदेव चकित होऊन उद्गारला.

" महंतांची भीति वाटते."

असेच कांहीं उद्गार जान्हवीनें कांहीं वर्षांपूर्वी अचानकपणें काढले होते हें वसुदेवास आठवलें. तेव्हांप्रमाणें याहि भीतीला नांवगांव नसेल असें त्यास वाटलें. प्रत्येक रसाची चव घेण्याची माणसाला हौस असते. एखाद्या भावनेनें त्याच्या आयुष्यांत प्रवेश केला नाहीं तर ती केवळ कल्पनेनेंच ओढून आणण्याचा तो यत्न करतो. तसेंच जान्हवीच्या बाबतींत होत असावें. तो किंचित् हंसून म्हणाला, " कांहीतरी वेड्यासारखं बोलते आहेस तूं ! चित्रकाराची भीति वाटते असं सांगितलंस, तर एखादे वेळीं पटेल तें—"

चित्रकाराच्या नांवाचा वसुदेवानें उल्लेख करतांच जान्हवीचा चेहरा लज्जेनें लाल पडला. जें सांगायची आपल्याला इच्छा आहे तें सांगतां येणार नाहीं, निदान यावेळीं सांगतां येणार नाही असें तिला वाटूं लागलें. ती कांहीं बोलत नाहीं असें पाहून वसुदेव म्हणाला, " भीति वाटण्यासारखं कांहीं घडलं का ? "

जान्हवीला वाटलें, जें सांगायचें तें आतां धडपणें सांगता येणार नाहीं. शिवाय जी घटना रात्रीं घडून आली तिच्यांतून आपण जसा एक असंदिग्ध निष्कर्ष काढला तसा इतरांना काढतां येईलच असें नाही. तेव्हां अर्धवट बोलून उगाच गोंधळ निर्माण करण्यापेक्षां सध्या बोलणें आवरतें घेणें बरें.

तिनें त्रोटकपणें उत्तर दिलें, " तसं कांहीं नाहीं ! "

हवें असलेलें उत्तर मिळालेलें पाहून वसुदेवहि अधिक कांहीं विचारण्याच्या भरीस पडला नाहीं. अर्धवट थट्टेनें, अर्धवट गंभीरपणानें तिची समजूत घालून तो निघून गेला.

गडाखालीं जातांना तो चित्रकारासहि आज आपल्याबरोबर घेऊन गेला. जान्हवीला त्यामुळें समाधानच वाटलें. सकाळी उठल्यापासून जान्हवीची आणि चित्रकाराची कित्येकदां दृष्टादृष्ट झाली. जी गोष्ट त्यानें काल हातांनीं

व ओंठानें केली, तीच तो आतां इतरांच्या समोर, केवळ नजरेनें करण्याचा प्रयत्न करीत आहे कीं काय असें जान्हवीला वाटे. परंतु जड प्रतिमेवर पडलेल्या फुलांप्रमाणें ती नजर तिच्या अंगावरून ओघळून पडे. कांहीं न बोलतां त्याच्या दृष्टिपथांतून ती दूर होई. हा सारा अवघडपणा तो वसुदेवाबरोबर निघून गेल्यामुळें कमी झाला होता. महंत तर घरीं परत आलेच नव्हते.

दुपारपर्यंत ती अेकटीच घरीं होती. विविध विचारांच्या लाटांवर तिचें मन हा सारा वेळ हेलकावत राहिलें होतें. महंतांना आपल्याविषयीं शारीरिक अभिलाषा वाटते हा विचार तिचें अंत:करण सारखें पिंजून काढीत होता. चित्रकाराच्या सान्निध्यांत घडलेला प्रसंगहि आपलीं सारीं भावसूत्रें आवरून आतां बाजूला बसला होता.

● ● ●

महंतांविषयीं तिला अथांग आदर वाटत होता, प्रेमहि वाटत होतें. परंतु या प्रेमांत पित्याविषयीं वाटणारा भक्तिभाव होता, गुरुजनांविषयीं वाटणारी श्रद्धा होती. पित्याचें रूपान्तर प्रियकरांत होणें ही गोष्ट अंगावर शहारे आणणारी होती, कल्पनेलाहि असह्य होती. ब्रह्मदेव आपल्या कन्येच्या सौंदर्यानें मोहित होऊन तिच्या मागें लागला ही गोष्ट कथा–पुराणांत तिनें वाचली होती. ब्रह्मदेवाची मुलगी तो मागें येतांच पळत सुटली त्याप्रमाणें आपणहि सैरावैरा पळत जावें, अगदीं जगाच्या आणि जीविताच्या सरहद्दी-पर्यंत पळत जावें असें तिला वाटलें. पण पळणें तरी सोपें थोडेंच असतें ? पिंजऱ्यांतल्या पक्षाप्रमाणें रणकालीच्या मर्यादित वातावरणांत ती वाढली होती. बाहेरचें जग काय आहे, कसें आहे याची तिला पुरेशी कल्पनाही नव्हती. पंख तुटलेल्या पांखरानें आकाशाकडे लालस दृष्टीनें पहावें मात्र, त्यांत उड्डाण करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगू नये. तुटलेल्या पंखांनीं धडपडावं, गजांवर छाती आपटून मरावं, हा एकच मुक्ततेचा मार्ग त्याला शिल्लक राहतो.

मरण्याची कल्पना मनांत आल्यावर तिला एखादे वेळीं वाटायचं, असंच छाती आपटून आपल्याला मरायचं असेल तर स्वामीजींची इच्छा तरी कां पुरी करूं नये ? मेलेलं शरीर शिळेसारखं अचेतन असतं. त्याप्रमाणेंच ज्या

शरीरावर मृत्यूनें आपली सही निशाणी करून ठेवली आहे तेंहि तसंच अचेतन असणार. या अचेतन, भावहीन शरीरानं महंतांची ही इच्छा पुरी करतां आली तर त्यांच्या अनंत ऋणाची थोडी तरी परतफेड केल्यासारखं होईल.

परंतु हा विचार तिच्या मनास फार वेळ सहन होत नसे. ज्या महंतांबद्दल ती बालपणापासून थोर श्रद्धा व पितृभाव बाळगीत आली त्यांच्या प्रणयचेष्टिताचें केवळ मानसिक चित्रहि तिला भयंकर उद्वेग आणणारें वाटे. रणकालीचा एखादा प्रचण्ड पहाड अंगावर कोसळून आपण त्याखालीं चिरडून जात आहोंत, आपलें शरीर व मन शतशः विछिन्न होत आहे असा तिला भास होई.

महंतांच्या जवळ ती वर्षानुवर्षे राहिली होती. शिल्पकारानें निराकार दगडांतून प्रतिमा तयार करावी त्याप्रमाणे महंतांनीं तिच्या जीवनाला आकार आणला होता या अनेक वर्षांच्या जीवनांत ती कितीदांतरी महंतांच्या जवळ गेली होती. त्यांचा हात किती वेळां तरी तिच्या मस्तकावरून, पाठीवरून, एखाद्या वर्षाकालीन मेघाप्रमाणें संजीवन देत फिरला होता. त्यांची भीति तिला नेहमींच आंतल्या आंत वाटत असे. पण त्यांची लाज मात्र तिला कधीं वाटली नाहीं. बाल्य संपून यौवनांत प्रवेश केल्यावरहि त्यांच्या संबंधीं लज्जेची भावना तिच्या मनांत कधी निर्माण झाली नव्हती. पृथ्वीवरच्या माणसानें आकाशाच्या अफाट विस्ताराकडे भक्तिभावानें पाहिलें, तरी त्या भावनेंत पार्थिव इच्छेचा अंशहि नसतो. महंतांकडे ती अशाच भूमिकेवरून, इतक्याच अंतरावरून पहात होती. परन्तु आतां तें आकाशहि कोसळूं पहात होतें.

ही आकाश कोसळण्याची भीति तिला कधींच वाटली नव्हती असें मात्र नव्हे. जगाच्या एका निर्जन कोपऱ्यांत उमलणारें तिचें स्त्रीत्व एखादे वेळीं नागाप्रमाणें वर फणा काढून सभोंवारच्या निस्तब्धतेचा उगाचच कानोसा घेऊं लागे. तिच्या प्रफुल्ल यौवनाच्या पाकळ्या आघात होण्याच्या भीतीनें उगाचच थरथरूं लागत. अशा वेळीं तिला महंतांचीहि भीति वाटायची. त्यांच्या नजरेंत शारीरिक अभिलाषा एखादे वेळी विजेप्रमाणें चमकून जात आहे कीं काय असा तिला भास होई. पाठीवर पडणारा हात कोठल्या तरी वेगळ्या जडपणानें तेथें स्थिर होत आहे कीं काय अशी तिला शंका येई. पण या शंका क्षणभरांत नाहींशा होत, पुरांतल्या गवताप्रमाणें वाहून जात. हे सारे

आपल्याच मनाचे खेळ आहेत याची तिला खात्री पटे. तारुण्यांत नव्यानें प्रवेश करणारी स्त्री जोराचा वारा आला तरी आपला पदर सांवरते, त्या वाऱ्यापासून आपल्या यौवनाचें रक्षण करूं पाहते. या नवथर भयशील वृत्तीची ही लीला असावी असें तिचें मन तिला सांगे. मनांतल्या मनांत ती महंतांच्या पायावर मस्तक ठेवी आणि या संशयाबद्दल क्षमायाचना करी.

परंतु आतां तें सारें खरें झालें होतें. आकाशांतील अनेक काजळी ढगांनीं एकत्र येऊन एका भयानक दैत्याचा आकार धारण केला होता व तो दैत्य समोर उभा राहून तिच्या शरीराची मागणी करीत होता !

महंतांच्या मनांत हें विलक्षण परिवर्तन कसें झालें याचें तिला राहून राहून नवल वाटत होतें. महंतांच्या अल्पकालीन सहवासांत, वसुदेवानें आपल्याला संसारी जगाशीं बांधणाऱ्या शृंखला तोडून टाकल्या होत्या. आणि याच काळांत महंत स्वतःसाठीं नवीन शृंखला घडवीत बसले होते ! एका दिव्याच्या ज्योतीवर दुसरा दिवा लागला होता. आणि आतां प्रकाश–दानाचें कार्य पुढें चालत आहे, या विचारानेंच कीं काय पहिल्यानें स्वतःस मालवून घेतलें होतें ! कीं फार प्रखर प्रकाश देणारे दिवे जास्त वेळ जळूंच शकत नाहींत? त्या प्रखरतेमुळेंच ते आपल्या जीवन–साधनाचें शोषण अधिक करतात आणि म्हणून जास्त प्रकाश देण्याच्या प्रयत्नांतच स्वतःची हत्या करून घेतात; पुढील काळोखाला आमंत्रण देऊन ठेवतात. महंत इतक्या उंचावर गेले होते की तेथून अधःपात होणें हीच एक पुढची गति शिल्लक राहिली होती. अनेकदां उत्कर्षाच्या पराकोटींतच अधोगतीचा प्रारंभ होतो. महंतांच्या अंतःकरणांत वर्षानुवर्षें बंदीवान् झालेल्या प्रवृत्ति बंड करून अखेरीं वरती आल्या होत्या का ?

आणि याला कारण कोणतं ? आपण स्वतः ? काल चित्रकारानें आपल्याला बाहुपाशांत घेतलें त्याच क्षणीं महंतांना आपल्या इच्छेची जाणीव झाली का ? त्याच क्षणीं त्यांच्या अंतःकरणांतील शरीरवासना साखळदण्ड तोडून मुक्त झाल्या होत्या का ? जान्हवी आपलीच आहे, आपल्याच ताब्यांत आहे, या भावनेनें संतुष्ट व बेसावध असलेला त्यांचा सुप्त प्रणयभाव त्या दृश्यामुळे एकदम उफाळून उठला होता काय ? चित्रकार जर आपल्या आयुष्यांत आला नसता तर?

चित्रकाराविषयीं तिच्या मनांत कांहीं नाजुक अपरिचित भावना निर्माण झाल्या होत्या यांत शंका नाहीं. गेले कित्येक दिवस तिच्या अंगप्रत्यंगांतून मोहरणारें तारुण्य वेलीप्रमाणे कशाचा तरी आधार शोधीत होतें हा आधार चित्रकाराच्या ठिकाणीं मिळत आहे असें तिला वाटले. वसुदेव किंवा महंत यांच्याप्रमाणें कोठल्या तरी अलौकिक कोटींत तो जाऊन बसलेला नव्हता. तो तिच्याप्रमाणेंच सामान्य होता. इतकेंच नव्हे, तर सामान्यावरतीच त्याची श्रद्धाहि होती. असामान्यांच्या जगांत धार्मिकतेला महत्त्व असेल, पण सामान्यांच्या जगांत मात्र रसिकताच सौंदर्य निर्माण करूं शकते. सामान्यांचें जीवन निरामय व उत्कट आनंदानें ओथंबून टाकण्याचें सामर्थ्य केवळ रसिकतेंत व सौंदर्याच्या उपासनेंतच आहे. असामान्यांच्या संगतींत तिच्या साध्यासुध्या मनाचा कोंडमारा होत होता. चित्रकारानें या तटबंदींतून प्रवेश केला होता. पण आतां महंतहि चित्रकाराच्या शेजारीं येऊन उभे राहिले होते !

चित्रकाराचा विचार मनांत आला कीं महंतांचा विचार त्यावर आक्रमण करी. स्वतःच्या सुखाचा विचार करायला तिला आतां सवडच नव्हती. एखाद्या झंझावाताप्रमाणें, मोठमोठे वृक्ष उन्मळून पाडीत, सर्व वातावरण धूलीमय करीत आणि चराचराच्या अस्तित्वाविषयीं अनिश्चितता निर्माण करीत आलेलें हें संकट कसें टाळावें, हा एकच विचार तिच्या अंतःकरणाचा कबजा घेऊन बसला होता.

आणि हें सारं रहस्य तिला आपल्या मनांत बद्ध करून ठेवावें लागत होतें. चारी बाजूंनीं धार असलेली एखादी वस्तू मुठींत दाबून ठेवण्यासारखेंच होतें तें. तें रहस्य मनांत दडवून ठेवणें जरूर होतें. परंतु मनाच्या सर्व बाजूंना तें सारखें खुपत होतें, सलत होतें. कीं हें सारें वसुदेवास सांगावें?

आतां वसुदेव हा एकच आधार तिला उरला होता. त्याच्याच जवळ ती आपलें अंतःकरण मोकळें करूं शकत होती. पुढें काय करावें, करूं नये, यासंबंधीं तोच एक मार्ग दाखवायला समर्थ होता.

वसुदेव परत यावयास अद्याप बराच अवकाश होता. दुपारी एकट्यानें घरांत रहाण्याची तिला भीति वाटूं लागली. महंत कांहीं न सांगतांच सकाळपासून बाहेर गेलेले; ते केव्हां माघारीं येतील याचा नेम नव्हता. वसुदेव येण्याच्या आधीं त्यांची आपली भेट होऊं नये म्हणून ती बाहेर पडली.

तिला अमूकच ठिकाणीं जायचें होतें असें नाहीं. सूर्यास्तापर्यंतचा वेळ तिला घराबाहेर काढायचा होता. तळ्याच्या पलीकडे ब-याच अंतरावर असलेल्या अेका कड्याच्या दिशेनें ती चालूं लागली.

ती बाहेर पडली तेव्हांच आकाश भरून येऊं लागलें होतें. सकाळची निरभ्रता नाहींशी होऊन मेघांचे थवे अचानकपणें आकाशांत येऊन दाखल झाले होते. वारा पडल्यामुळें सारें वातावरण कुंद व स्तब्ध झालें. आभाळाच्या त्या पोलादी छताखालून, सभोवार दाटलेल्या निस्तब्धतेंतून, जान्हवी वाट काढीत पुढें चालली.

• • •

# १२

जान्हवी एका खडकाच्या आडोशाला जाऊन उभी राहिली. त्या आडोशाचा खरोखर फारसा उपयोग नव्हता. जवळ आडोसा आहे एवढेंच समाधान त्यांत होतें समोरच्या दिशेनें येणाऱ्या पावसाच्या धारांनीं ती थोड्याच अवकाशांत भिजून ओली चिंब झाली. वैशाखांत अकालीं आलेला पाऊस होता तो. त्याच्याजवळ कोठलीहि मर्यादा नव्हती. आपलें अल्पकालीन आयुष्य शक्य तेवढें गाजवून घेण्याच्या ईर्षेनें तो जणुं उन्मत्त झाला होता. दोनचार मिनिटांतच मुसळधार पाऊस पडूं लागला. आकाश व पृथ्वी यांना जोडणाऱ्या पाण्याच्या जाड रुपेरी तारा सर्वत्र लकलकूं लागल्या. थोड्या वेळापूर्वी अंतराळांत अधिराज्य गाजविणारा सूर्य मेघांच्या गर्दींत दिसेनासा झाला. खडकावरून पाणी वाहूं लागलें. झाडाच्या पानापानांतून पाण्याच्या धारा गळूं लागल्या.

जान्हवीनें डोक्यावरून पदर घेतला व खडकाला बिलगून ती उभी राहिली. अंगावरचें लुगडें भिजून जागोजाग अंगाला चिकटून बसलें होतें. भिजलेल्या वस्त्रांतून तिच्या शरीराचा सुन्दर वर्ण व आकार प्रकट होत होता. तिच्या डोक्यावरून व तोंडावरून पाणी ठिबकत होतें व तें वारंवार ओल्या पदरानें ती टिपून घेत होती.

जान्हवी या अवस्थेंत उभी असतां तिला कोणाची तरी चाहूल लागली. तिनें मान वळवून पाहिलें.

महंत तिच्याकडे येत होते.

ती एकदम भयभीत झाली. तिचें अंतःकरण धडधडूं लागलें. नेमकें नको तेंच घडलें होतें.

महंत जवळ आले.

" जान्हवी—"

जान्हवी कांहींच बोलली नाहीं.

" तूं इथें कशी आलीस ? पावसानं किती भिजून गेली आहेस!"

" मी जातें घरीं—"

" एवढयांत नाहीं."

" म्हणजे ?"

" म्हणजे काय तुला ठाऊक आहे."

तेथून निघून जाण्यासाठीं जान्हवीनें पाय उचलला होता. पण तो पुढें पडूं शकला नाहीं. महंतांना ओलांडून जाणें सर्वथैव अशक्य होतें. तिच्या पायांतील सर्व शक्ति एकदम नाहींशी होऊन ते खचल्यासारखे झाले. आत्मरक्षणाचा मार्ग न उरलेल्या एखाद्या हरिणीप्रमाणें, ती कावरीबावरी व मूढ होऊन आपल्या भिजलेल्या अंगाकडे संकोचानें पाहूं लागली.

महंतहि आपल्याकडे, आपल्या शरीराकडे पहात असल्याचें तिला जाणवलें. त्यांची दृष्टि तिच्या सर्वांगाला स्पर्श करीत होती. त्यांचा श्वासोच्छ्वास तिला ऐकूं येत होता.

" ठाऊक आहे ना ? " महंत जरा वेळानें म्हणाले.

जान्हवी गप्पच राहिली. काय बोलावें, कसें बोलावें, हें तिला सुचेना. एकदम महंतांच्या पायावर लोळण घ्यावी, व त्यांच्या छातीवर डोकें ठेवून मनसोक्त रडावें असें तिला वाटलें. परन्तु ज्या भूमिकेंत महंत आतां समोर आले होते, त्या भूमिकेंत त्यांच्या पायांनाहि स्पर्श करण्याचा धीर तिला होईना.

तिनें सभोंवार पाहिलें. सोसाटयानें आलेला पाऊस सोसाटयानेंच आतां ओसरूं लागला होता. वादळी वारा एखाद्या रखवालदाराप्रमाणें अवेळीं येणाऱ्या ढगांच्या मागें लागून त्यांना आकाशांतून पळवीत होता. सूर्य पुन्हां

दिसूं लागला होता व त्याचें सोनेरी ऊन पावसाच्या धारांत भिजून पृथ्वीवर ओलें होऊन पडत होतें.

क्षणा दोन क्षणांत पाऊस थांबला व पूर्वेच्या बाजूला एक दुहेरी इन्द्र-धनुष्य रत्नजडित कमानीप्रमाणें आकाशांत उभें राहिलें. जान्हवीला वाटलें, हें इन्द्रधनुष्य जर जवळ, आपल्या अगदीं जवळ असतें, तर आपण झरकन् त्यावर चढून गेलों असतों आणि एखाद्या विशाल काळ्या कभिन्न ढगाच्या आड दडून बसलों असतों—

पण तें इन्द्रधनुष्य दूर, फार दूर होतें. जवळ होते ते महन्त.

महंतांविषयी तिला तिटकारा किंवा त्वेश वाटणें अगदीं अशक्य होतें. अनपेक्षित जागेंतून बाहेर पडणाऱ्या सर्पाप्रमाणें त्यांच्यांत झालेला हा पालट पाहून ती भयचकित झाली होती यांत शंका नाहीं. परन्तु महंतांना दुख-वायला, अनुचित शब्दांनीं त्यांचा अपमान करायला, ती तयार नव्हती. तिचें सारें आयुष्य एखाद्या शिल्पकाराप्रमाणें त्यांनीं घडविलें होतें. अमाप वात्सल्यानें व प्रेमानें त्यांनीं तिचें लालनपालन केलें होतें. आपलें रक्षण व्हावें व त्याचबरोबर महंतांचें स्वतःच्या वासनेपासून रक्षण व्हावें अशी तिची मनोमन इच्छा होती.

तिनें महंतांकडे एकदां चोरून पाहिलें. केवढा बदल झाला होता त्यांच्या चर्येमध्यें, चर्येवरील आविर्भावांमध्यें? तेथें सतत राहाणारे उदात्ततेचे, वत्सलतेचे आणि निरामय आनंदाचे भाव आतां संपूर्णतः मावळून गेले होते. अनेक वर्षांची तपश्चर्या एकाएकीं तेथून उठून गेली होती. वर्षानुवर्षें बंदीवान होऊन राहिलेल्या एकाच विचारानें सारीं बंधनें तोडून त्यांच्या शरीराचा, त्यांच्या मुद्रेचा, त्यांच्या डोळ्यांचा ताबा घेतला होता. त्यांच्या डोळ्याला डोळा देण्यास ती धजली नाहीं. प्रखर दिव्याकडे पहातांच माणसानें आपली नजर बाजूला घ्यावी त्याप्रमाणें ती चटकन् खालीं पाहूं लागली.

महंतांच्या साऱ्याच भावना प्रबल होत्या. त्यांच्या मनाचे सारेच आविष्कार असामान्य होते. तिला वाटलें, ज्या निर्धारानें त्यांनीं आपलें जीवन आतां-पर्यंत गोर-गरीबांच्या सेवेंत व तत्त्वचिंतनांत घालविलें, त्याच अविचल निर्धारानें ते आतां आपल्या शरीरवासनेचें समाधान करण्यास उद्युक्त झाले आहेत.

जान्हवीच्या मौनाचा महंतांनीं काय अर्थ घेतला कुणास ठाऊक ! ते तिच्या जवळ आले व म्हणाले, " जान्हवी, तुला राग आला का माझा ? "

जान्हवीला आतां बोलण्यावाचून गत्यन्तर नव्हतें. ती खालीं पहातच पुटपुटली,

" नाहीं, मला भीति वाटते आहे ! "

" चित्रकाराची भीति नाहीं वाटत ? "

" नाहीं. "

" तूं प्रेम करतेस त्याच्यावर ? "

" कुणास ठाऊक ! मला कांहींच कळत नाहीं. "

महंत क्षणभर गप्प राहून म्हणाले, " तें कांहीं का असेना, तूं माझी आहेस ! मला हवी आहेस ! आज तरी हवी आहेस. तसल्या त्या काव्यमय प्रेमाचा बहाणा मी करीत नाहीं. कारण त्या गोष्टी गेल्या वीस वर्षांत मी विसरून गेलों आहें. पण माझं शरीर मला विसरतां आलेलं नाहीं. काल तें दृश्य पाहून माझं शरीर आपल्या सर्व शक्तींसह जागं झालं. मीं प्रयत्न केला, खूप प्रयत्न केला. पण त्यांत यशस्वी झालों नाही मी. मी पराभूत झालों आहें. शरीर खोटं आहे असं मी मानीत आलों. पण मला शेवटीं कळून आलं कीं शरीर हेंच एक सत्य आहे. सुरुवातीपासून मी माझ्या विकार-वासना दड-पून टाकल्या. मला वाटलं, मी त्यांच्यावर जय मिळविला आहे. त्या मरून गेल्या आहेत असं मी समजलों परंतु त्या मेल्या नव्हत्या हवेचं भक्षण करून जगणाऱ्या सापाप्रमाणें त्या जगत राहिल्या आणि वेळ येतांच उपाशी हिंस्र पशूप्रमाणें त्या माझ्या अंतःकरणाची, माझ्या ध्येयाची, माझ्या साऱ्या जीव-नाची मोडतोड करून बाहेर पडल्या आहेत ! "

" कांहीं तरी भलतंच बोलूं नका. " जान्हवी कासावीस होऊन म्हणाली. " मला हें ऐकवत नाहीं. मी तुमची मुलगी आहें—"

" कालपर्यंत होतीस; आज नाहींस. आज तूं एक स्त्री आहेस, फक्त एक सुंदर, तारुण्यांत आलेली स्त्री आहेस—"

" किती भयंकर बोलतां आहांत आज ! एका दिवसांत—एका रात्रींत इतके बदलून गेलांत—"

" नाहीं, एका रात्रींत झालेला बदल नाहीं हा जान्हवी. गेले कित्येक

दिवस हीं हजार भुतें मशाली पेटवून माझ्या भोंवतीं नाचत आहेत. जें जें मीं पवित्र मानलें, श्रेष्ठ मानलें त्याला आग लावण्याची शिकस्त करीत आहेत· माझ्या जबरदस्त श्रद्धांवर घण घालीत आहेत. हा संग्राम मीं सर्वांपासून दडवला. तुझ्यापासून वसुदेवापासून दडवला. खुद्द माझ्यापासूनहि दडवला. कारण मी त्या पिशाचांशीं झगडत होतों व अखेर मी जिंकेन अशी मला आशा होती. म्हणूनच मी जास्त जास्त निर्जनांत, एकांतांत राहूं लागलों. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. शेवटीं पराभव पत्करावा लागला मला. माझ्या निष्ठा उध्वस्त झाल्या. आजवर मानलेलं सारं खोटं आहे असं मला वाटूं लागलं "

"सारं खोटं ?" जान्हवी उद्गारली.

"सारं खोटं ! साऱ्या कल्पना ! ईश्वराची कल्पना, आत्म्याची कल्पना, मायेची कल्पना आणि अद्वैताचीहि कल्पनाच. कल्पनांच्या मनोनिर्मित यात्रे-मध्यें मी काल्पनिक ध्येयांचं ओझं पाठीवर घेऊन हिंडत होतों. हें सर्व जेथून निर्माण झालं त्या शरीराकडे मात्र मीं लक्ष दिलं नाहीं. पण आतां वाटतं कीं, जें आहे तेंच सत्य आहे, जें दिसतं तेवढंच खरं आहे. शरीर खरं आहे. शरीराच्या संवेदना खऱ्या आहेत— "

"नाहीं ! नाहीं ! खोटं आहे हें सारं !" जान्हवी उद्गारली.

"खोटं नाहीं जान्हवी. निसर्गधर्म हाच खरा धर्म. हेंच एक स्वयंसिद्ध सत्य आहे. बाकी सारं काल्पनिक या सत्याला मर्यादा आहेत त्या केवळ सामाजिकतेच्या. पण आपण इथं समाजापासून दूर आहोंत, अलिप्त आहोंत. या निर्जन डोंगरावर समाजाच्या शृंखला मला बांधूं शकत नाहींत.

"पण हें वाईट आहे—"

"वाईट हा केवळ शब्द आहे. शब्दांच्या व त्यांतून निर्माण होणाऱ्या कल्पनांच्या लाटांवर आजपर्यंत माझं जीवन अधिष्ठित झालं होतं. पण ते आधार आतां नष्ट झाले आहेत. दावानलांत सांपडलेल्या झाडाझुडपांप्रमाणें जळून नामशेष झाले आहेत. जान्हवी, तूं माझी आहेस. जान्हवी— "

महंत बेहोषपणानें पुढें आले. त्यांनीं जान्हवीचा हात धरला व तिला आपल्या कवेंत ओढलें. एखाद्या अजस्र अजगराच्या विळख्यांत हरणाचें पाडस खेंचलें जाऊन दिसेनासें व्हावें त्याप्रमाणें ती महंतांच्या विशाल बाहु-पाशांत बांधली गेली, दिसेनाशी झाली. तिचा जीव आंतल्या आंत गुदमरूं

लागला. प्रणयाचा कोठलाहि रस, शारीरिक सुखाची कोठलीहि संवेदना अंत:करणांत निर्माण होत नव्हती. जळजळत्या पोलादाच्या कांबी चहूंबाजूंनीं अंगावर लपेटल्या जात आहेत असें तिला वाटलें. तिच्या सर्व शरीरांत कोठलें तरी असामान्य सामर्थ्य अचानक सळसळूं लागलें. हें सामर्थ्य एकवटून तिनें महंतांचे हात बाजूला केले आणि त्यांच्या बाहुपाशांतून ती विजेप्रमाणें बाहेर पडली.

हें सामर्थ्य क्षणिक आहे याची तिला जाणीव होती. आत्मरक्षणासाठीं त्याचा फार वेळ उपयोग होणार नव्हता.

पलीकडे पंचवीस तीस फुटांवर एक मोठा थोरला कडा तुटलेला होता. ती एकदम कड्याकडे धांवत गेली आणि त्याच्या कांठाशीं उभी राहून आवेगानें म्हणाली, " तुम्ही पुढें आलांत—तर—तर—मी खालीं उडी टाकीन ! तुमचा अध:पात घडवून आणणारं माझं हें शरीर नष्ट करून टाकीन ! "

खोल दरीच्या कांठाशीं उभ्या राहिलेल्या जान्हवीच्या आकृतीकडे पहात महंत कांही वेळ तसेच उभे राहिले. ते कांहींच बोलले नाहींत कीं पुढें आले नाहींत. त्यांच्या चेहेऱ्यावरचे भाव भराभर बदलत होते; निवळत होते. जणूं कोठल्या तरी अनिष्ट स्वप्नांतून अथवा मूर्छेतून ते जागे होत होते. क्षणभरानें संथ पावलें टाकीत ते पुढें आले व शांतपणानें म्हणाले, " जान्हवी, घरीं जा. असा त्रास तुला पुन्हा कधींहि व्हायचा नाहीं. "

महंतांच्या शब्दावर जान्हवीचा विश्वास होता. कड्याच्या कांठावरून ती माघारीं वळली आणि मठाकडे गेली.

—महंत तेथेंच उभे होते.

• • •

# १३

जान्हवी घराकडे जायला निघाली खरी, परंतु मठाच्या भिंती दुरून दिसूं लागतांच तिच्या अंत:करणांत पुन्हां विविध भावनांचे व विचारांचे कल्लोळ उसळूं लागले.

गेलीं कित्येक वर्षे संथपणानें वाहणारें तिचें जीवन एकाएकीं प्रक्षुब्ध

होऊन दोन्ही थडींवर आदळूं आपटूं लागलें होतें. सपाटीवरून विश्रब्ध वृत्तीनें वाहणारी नदी, एकदम उंच कड्यावरून खालती कोसळावी आणि तो एकसूत्री ओघ सहस्रश: फाटून तुटून अगतिकपणें खालीं आदळावा, तशी तिची अवस्था झाली होती. काटेरी झुडुपावरून फरफटत ओढलेल्या वस्त्राप्रमाणें सारें पूर्व चिरून विदीर्ण होऊन गेलें होतें, भविष्याचा मार्ग अज्ञात होता, आणि वर्तमान केवळ वेदनामय होता, केवळ प्रक्षोभमय होता.

मठाच्या भिंती जसजशा जवळ येऊं लागल्या तसतशीं तिचीं पावलें आपोआप मंदावूं लागलीं. त्या भिंती पूर्वींसारख्याच उभ्या होत्या. तो पर्णमंडप पूर्वींसारखाच होता. तें बाहेरचें अंगणहि पूर्वींचेंच होतें. पण आतां आपल्याला या साऱ्या परिसरांत पूर्वींसारखें जगतां यईल का? सूर्यकिरणांचा हात धरून भूगर्भातून बाहेर आलेल्या एखाद्या वनवेलीप्रमाणें ती त्या आश्रमांत जगत होती. प्रमाच्या वातावरणांत फुलत, बहरत होती. आतां तें जीवन पुन्हां लाभणें शक्य होतें का? दिवसाच्या प्रकाशांत आनंदानें नाचणारी आणि रात्रीच्या वक्ष:स्थळावर शान्तपणें विश्रान्त होणारी, उष:कालीं आकाशांतून ओघळणाऱ्या मोत्यांचे हार गळ्यांत घालून सूर्याला सामोरी होणारी आणि सूर्यास्ताचे मनोहर रंगविलास स्तिमित दृष्टीनें पहात बसणारी, वृक्षांशीं गुजगोष्टी करणारी, पांखरांशीं व फुलपांखरांशीं खेळणारी ती वेल आतां उरली होती कुठें? अचानक उफाळलेल्या वणव्यांत ती जळून गेली होती!

घरांत पुन्हां प्रवेश करणें अशक्य आहे असें जान्हवीला आढळून आलें. थोड्या अंतरावर दिसणारा तो मठ तिच्यापासून खरोखर फार दूर गेला होता. भूतकालांत जमा झालेल्या वस्तूप्रमाणें अंधुक, अस्पष्ट झाला होता. जिवंत माणसाला आपलीं पावलें फिरवून भूत-कालाकडे कधींहि जातां येत नाहीं—

महंतांनीं तिला आश्वासन दिलें होतें खरें. पण तें पाळलें जाईल असा विश्वास तिला वाटत नव्हता. अजिंक्य निर्धारानें उभा असलेला चिरेबंदी तट एकदां ढांसळला होता, तो पुन्हांहि ढांसळूं शकेल. जें मन एकदां विचलित झालें, तें पुन्हां हजारदां विचलित होऊं शकेल. मोहवश होण्यास आपण त्यांना पुन्हां अवसरच देतां कामा नये असें तिला वाटलें. सततच्या सान्निध्यांत

महंतांचा निर्धार टिकून राहणें कठिण. आणि यदाकदाचित् राहिला तरी आपल्या परस्पर संबंधांतील पूर्वींची निर्व्याजता, तें पूर्वींचें प्रेम यापुढें पुन्हां जीव धरूं शकेल का ?

महंतांबद्दल तिच्या मनांत असलेली प्रेमाची व आदराची भावना त्या प्रसंगानें मुळींसुद्धां कमी झाली नव्हती. महंतांपासून स्वतःचें रक्षण केलें पाहिजे, त्याप्रमाणें आपल्यापासून महंतांचें रक्षण करण्याची जबाबदारीहि आपल्यावरच आहे असें तिला वाटलें...

—आणि हें करण्यासाठीं अेक गोष्ट अपरिहार्य होती. अेकच मार्ग होता. तो म्हणजे महंतांपासून दूर होणें ! महंतांच्या घराचा व आश्रयाचा कायमचा त्याग करणें !

हें करणें फार दुर्घट होतें यांत शंका नाहीं. हाडामांसानें अंगाशीं जोडलेलीं कवचकुंडलें कर्णानें इंद्राला देण्यासाठीं तोडून काढलीं. तशाच प्रकारचें दिव्य आज तिला करावयाचें होतें. ज्या सहस्र बंधनांनीं ती या घराशीं देहानें व मनानें जोडली गेली होती तीं स्वतःच्या हातानें तोडायचीं होतीं; आतां-पर्यंतच्या जीवनावर स्वतःच्या हातानें तिलांजली देऊन नव्या जीवनाच्या शोधार्थ अज्ञाताच्या अंधारांत पाऊल टाकावयाचें होतें.

परंतु हें करण्यावांचून गत्यंतरच उरलें नव्हतें. अनेक दाहक प्रश्नांना गृहत्याग हें अेकच अेक उत्तर होतें !

ती मठाच्या दाराशीं येऊन उभी राहिली. आंत जायचें नाहीं असा आतां तिच्या मनाचा निश्चय झाला होता.

त्या आश्रमाकडे अविचल दृष्टीनें पहात ती उभी राहिली. तेथील प्रत्येक वस्तूचा, प्रत्येक झाडाचा व वेलीचा ती आपल्या डोळ्यांनींच निरोप घेत होती. तिच्या अंतःकरणांत माणसाप्रमाणें वृक्षवेलींनाहि प्रेमाची जागा होती. त्या अंगणांतील सर्व वेलींची व फुलझाडांची तिनें वत्सल प्रेमानें जोपासना केली होती. वडीलधाऱ्या माणसांप्रमाणें त्या परिसरांतील थोर व वृद्ध वृक्षांची तिनें हार्दिकपणानें सेवा केली होती. हें सारें सोडून जावयाचें होतें आणि या सर्वांहून विशेष म्हणजे त्या घरास घरपणा आणणाऱ्या, तिच्या जीवनाला व मनाला आकार देणाऱ्या, सहस्रावधि माणसांतील त्या एका माणसाला, महंतांना सोडून जावयाचें होतें.

ज्या वृक्षाचा आधार घेऊन ती उभी होती त्याला तिनें आवेगानें मिठी मारली व त्याच्या रुक्ष, राठ खोडावर आपलें डोकें ठेवून ती एकदम हुंदके देत रडूं लागली.

रडण्यामुळें कीं काय तिचें क्षुब्ध, ताणलेलें मन नंतर कांहींसें शांत झालें. तिनें भक्तिभावानें त्या मठाला व महंतांच्या मनोमय मूर्तीला नमस्कार केला. रणकालीच्या मंदिराकडे तोंड करून तिलाहि तिनें अभिवादन केलें. आणि नंतर गडाखालीं जाणाऱ्या वाटेनें ती चालूं लागली.

वसुदेव शेलारवाडीला गेला होता. तो आपल्याला खालीं गांवांत किंवा वाटेवर भेटेल अशी तिची अपेक्षा होती. त्याची भेट घेऊनच तिला आपला पुढील मार्ग ठरवावयाचा होता. चित्रकारहि आज त्याच्या बरोबर शेलार-वाडीलाच गेला होता.

चित्रकाराचें स्मरण होताच तिच्या अंतःकरणावरून उत्साहाची एक नवीन लहर थरथरत गेली



जान्हवी गड उतरून पायथ्याशीं येऊन पोहोंचली. आतांपर्यंत मनावर पडलेला ताण आणि डोंगर उरतांना शरीरास झालेला शीण यामुळें ती अगदीं थकून गेली. पायथ्यापासून थोड्या अंतरावर असलेल्या एका झाडाच्या खालीं ती बसली.

सूर्य मावळतीकडे उतरलेला होता. आकाश अगदीं निरभ्र झालें होतें घटकेपूर्वी होऊन गेलेल्या पावसाचा व वादळाचा अवशेषहि आकाशांत दिसत नव्हता. ग्रीष्मानें तापलेल्या भूमीवर मात्र त्या पावसाचे विविध अवशेष गतकालीन सुखाच्या स्मृतीप्रमाणें तरंगत होते. मुरुमाच्या मातींत ओलसर-पणा दिसत होता, व खडकावर वाहून गेलेल्या पाण्याच्या खुणा होत्या. वारा येतांच झाडांच्या पानांतून अधूनमधून पाण्याचे थेम्ब अद्यापहि खालीं ठिबकत होते. जणूं आतांपर्यंत आपल्या पर्णसंभारांत दडवून ठेवलेलें जड-जवाहर, वाऱ्याच्या दंगामस्तीला भिऊन तीं झाडें पटापट त्याच्यापुढें जमिनीवर टाकून देत होतीं.

जान्हवीनें सहज आकाशाकडे पाहिलें. एक करकोचांची रांग आकाशांतून चालली होती. आकाशाच्या विस्तीर्ण निळ्या समुद्रांतून पांढऱ्या शुभ्र

गलबतांचें हें चिमकुलें आरमारच प्रवास करीत आहे अशी जान्हवीच्या मनांत कल्पना आली. सारे पक्षी संथपणानें, एका गतीनें, एका दिलानें चालले होते त्यांच्या शुभ्र पंखांची हालचाल कुशल नाविकांच्या वल्हया-प्रमाणें समतानतेनें होत होती. कितीतरी वेळ जान्हवी एकाग्र दृष्टीनें त्या रांगेकडे पहात बसली. कोंवळ्या कणसांनीं बहरलेल्या शेतांचा शोध घेत हे पक्षी शेंकडों मैलांचें अंतर ओलांडून जात असतात हें तिनें ऐकलें होतें. स्वाभाविक आवश्यकतेशिवाय कोठलेंहि बंधन न मानणारें तें स्वैर आणि सामर्थ्यवान जीवन पाहून तिला मौज वाटली. तिच्या मनांत विचार आला, हजारों पाशांनीं बांधलेला आणि जमिनीशीं जखडलेला माणूस या पक्ष्यांपेक्षां खरोखर अधिक सुखी असूं शकेल काय? निळ्या अथांगतेमधील हे मुशाफिर परमेश्वराचे आशीर्वाद पाठीवर घेऊनच प्रवास करीत आहेत कीं काय, असा भास होतो. मखमली कापडावरून ओघळणाऱ्या मोत्यांप्रमाणें वाटणाऱ्या त्या सुंदर जमावांत कोठल्याहि श्रमाचें, वेदनेचें अथवा व्यथेचें चिन्हहि दिसत नव्हतें. या पक्ष्यांप्रमाणें आपल्यालाहि आभाळांतून प्रवास करतां आला असता तर..

"जान्हवी—"

वसुदेवाची हांक ऐकून जान्हवी भानावर आली. तो केव्हां जवळ येऊन उभा राहिला हेंहि तिच्या ध्यानांत आलें नव्हतें.

जान्हवीला एका झाडाखालीं अशी एकाकी बसलेली पाहून वसुदेवास फार आश्चर्य वाटलें.

त्याला बघतांच जान्हवीचे डोळे पाण्यानें भरून आले. ती खालीं मान घालून क्षणभर तशीच स्तब्ध राहिली.

"काय झालं जान्हवी?" वसुदेवानें तिच्या खांद्यावर हात ठेवून विचारलें.

त्या स्नेहमय हातानें जान्हवीच्या काळजालाच स्पर्श केला. अंतःकरणांत सांचलेला कष्टभार त्या स्पर्शामुळें एकदम बाहेर येण्यासाठीं धडपडूं लागला. दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकून ती रडूं लागली.

वसुदेवाला कल्पना आली. जान्हवीनें सकाळीं त्याच्या जवळ व्यक्त केलेली भीति शेवटीं खरी ठरली होती काय? त्याला जें अशक्य वाटलें होतें तें खरोखरच प्रत्यक्ष घडून आलें होतें काय?

जान्हवीचें रडणें ओसरल्यावर त्यानें पुन्हां तो प्रश्न तिला केला.

जान्हवीनें वसुदेवापासून कधींहि कांहीं लपवून ठेवलें नव्हतें. तिच्या विश्वासाचें व निष्ठेचें तेंच एक अढळ ठिकाण होतें.

घडलेली सारी हकीकत तिनें त्याला हळू हळू सांगितली. चित्रकाराच्या सहवासांत घडलेली घटनाहि तिनें त्याच्यापासून चोरून ठेवली नाहीं. चित्रकार वसुदेवाबरोबर आला नाहीं या गोष्टीचें तिला समाधानच वाटलें. त्याच्या समोर वसुदेवाशीं इतक्या मोकळेपणानें बोलतां आलें नसतें.

सारें कांहीं सांगितल्यावर ती हलक्या आवाजांत म्हणाली, " मी आज आतांच्या आतां निघून जाणार आहें इथून. जाऊं ना ?

वसुदेवापुढें असे विचित्र प्रश्न कधीं उभे राहिले नव्हते. सर्व हकीगत ऐकून तो दिङमूढ झाला होता. श्रद्धेच्या ज्या सुंदर भव्य मंदिरांत तो रहात होता तें एकाएकीं उध्वस्त झालें होतें. जान्हवीप्रमाणेंच त्यालाहि महंतांचा राग आला नाहीं. त्यांच्या संबंधीं कोठल्याहि अनुदार भावनेनें त्याच्या मनाला स्पर्शहि केला नाहीं एखादा नैसर्गिक उत्पात पाहून माणूस केवळ भांबावून जावा आणि आपल्या बलहीनतेची, अगतिकपणाची तीव्र जाणीव मात्र त्याला व्हावी तसें त्याला वाटलें. त्याच्या मनांत विचार आला, जो मार्ग आपण सोडला त्याच मार्गाकडे महंत जाऊं लागले आहेत ! दिवा दाखवून त्यांनीं अंधारांतून आपल्याला रस्ता दाखवला, आतां आपल्या हातानें दिवा मालवून ते स्वत: परत अंधाराकडे पाऊल टाकूं लागले आहेत !

परंतु विचारांचे पापुद्रे उकलीत बसायला आतां अवसर नव्हता. निर्णय घेणें आणि तोहि ताबडतोब घेणें जरूर होतें. एकच निर्णय घेणें शक्य होतें व इष्ट होतें.

" होय. तूं जावंस असं मलाहि वाटतं—" तो रुद्ध स्वरानें म्हणाला. " पण कुठें जाणार तूं ?"

जान्हवी कांहींच उत्तरली नाहीं. तिनें जाण्याचा निश्चय केला होता खरा, पण कुठें जायचें या प्रश्नाचें उत्तर ती अद्याप स्वतःच्या मनासहि देऊं शकली नव्हती. शेलारवाडीच्या जवळपास असलेल्या एक दोन गांवांत तिचे कांहीं दूरचे नातेवाईक होते. परन्तु त्यांच्याकडे जाऊन रहाण्याची तिची इच्छा नव्हती. संसारी जीवनांत प्रवेश करण्यास हरकत नव्हती. पण त्यांचें संसारी

जीवन म्हणजे गोगलगायीप्रमाणें सतत जमीनीवरून सरपटत जाणारें, आपल्या अस्तित्वाची अशुद्ध रेषा जमीनीवर उमटवीत जाणारें. तिचे पंख जखमी झाले होते पण तुटले नव्हते. आकाशाच्या अंतरंगांत पुन्हां भरारी मारण्याची, मेघांतील पाणी टिपून घेण्याची, चन्द्रसूर्याच्या किरणांशी खेळण्याची त्या पंखांतील आकांक्षा, त्या घायाळ अवस्थेंतहि आंतल्या आंत फडफडत होती. तिच्या डोळयांपुढें एकदम चित्रकाराची मूर्ति उभी राहिली. पण पण— वसुदेव सांगेल तें मान्य करण्यास ती तयार होती.

" जान्हवी " वसुदेव म्हणाला, " तुझ्याविषयीं माझी भावना काय आहे हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. दुसऱ्या कोणत्याहि कारणासाठी मी तुला जा असं म्हटलं नसतं. पण तूं गेल्यामुळें तुझं तर रक्षण होईलच पण, माझ्या दृष्टीनें अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे महंतांचा अधःपात टळेल ही होय. मनुष्य स्वभावतः स्खलनशील आहे. महंत कितीहि मोठे असले तरी ते शरीरानें जगत आहेत तोंपर्यन्त त्या शरीराकडून ते पुन्हां पराभूत होण्याचा संभव आहे. तो कांहींहि करून टाळलाच पाहिजे. महंतांचं जीवन फार विशाल आहे जान्हवी. पर्वताचा एखादाच सुळका आकाशांत उंचवर जातो, पण त्या शिखराच्या उंचीवरूनच त्या पर्वतमालेची उंची ठरते. महंतांसारखीं माणसं संसारी जीवनाच्या क्षुद्र शृंखला तोडून, विश्वांत जें परम आहे-पवित्र आहे, अनंत आहे, त्याच्या दरवाजापर्यंत पोहोंचलेलीं असतात. मनुष्य जातीची उंची या थोडया माणसांवरून मोजायची असते. माणसाचा अंतिम अभ्युदय या माणसांवर अवलंबून असतो. आणि म्हणून कोणतीहि किंमत देऊन त्यांचें रक्षण केलें पाहिजे. मी खरंच सांगतों, तुझ्या शीलाचांहि मला फारसं महत्त्व वाटत नाहीं. त्याच्या दानानं महंतांचं अकल्याण होणार नाहीं असं जर मला वाटलं असतं तर तुला मीं इथेंच राहायला सांगितलं असतं. परंतु महंतांनीं जो मार्ग पत्करला आहे त्यावरती अशा विश्रांतिस्थळांना जागा नाहीं. महंतांची शिकवणूक, त्यांचा संदेश माझ्या अंतरंगांत इतका दृढ झाला आहे कीं त्यांच्या मनानेंच मी विचार करतों. या क्षणिक अधःपातांतून, या अल्पकालीन पराभवांतून ते पुन्हां वरती आल्यावांचून रहाणार नाहींत. तीस वर्षे दाबून ठेवलेली वासना घटकाभर वरती उफाळून आली असेल, देहाचा व मनाचा तिनें

ताबाहि घेतला असेल. परंतु तीन तपांच्या तपश्चर्येनें सिद्ध झालेल्या अपार सामर्थ्यापुढें हा उद्रेक टिकणार नाहीं. पण त्यासाठीं तूं इथून जायला हवंस."

"कुठें जाऊं मी ?" जान्हवीनें कातर आवाजांत विचारलें.

"तूं चित्रकाराबरोबर जा. त्याचं तुझ्यावर प्रेम आहे हें मला आधींच ठाऊक झालं होतं. आम्ही दोघं आज बराच वेळ बरोबर होतों. त्यानंच मला आपण होऊन सारं कांहीं सांगितलं. तुलाहि त्याच्या विषयीं कांहीं तरी वाटत आहे असं मी समजतों."

क्षणभर वसुदेव थांबला. जान्हवी कांहीं बोलेल अशी त्याची अपेक्षा असावी. पण ती कांहींच उत्तरली नाहीं.

"या प्रेमांत अमंगल, अपवित्र असं कांहींहि नाहीं. प्रेम हें स्वभावतःच मंगल आणि पवित्र आहे. कोणतेंहि प्रेम अपवित्र असूंच शकत नाहीं. त्यावर इतर अनिष्ट वृत्ती जेव्हां आक्रमण करतात तेव्हां तें अपवित्र होतं. प्रेमांतील शारीरिकतेचेंहि भय बाळगूं नकोस. आत्मा शरीराचं आवरण घेऊनच जगांत अवतरतो. सर्वांनाच हें कवच फोडून बाहेर येतां येत नाहीं. प्रेम म्हणजे दोन आत्म्यांना परस्परांत विलीन होण्यासाठीं वाटणारी ओढ. ज्यांना शरीर अजिक्य आहे त्यांनीं शरीराच्या मार्गानेंच या मीलनाची पूर्तता करावी हें योग्य होय. आमचा रस्ता वेगळा आहे; पण हाच रस्ता सर्वांचा आहे, सर्वांना साध्य आहे, असं मी मानीत नाहीं. तूं खुशाल चित्रकाराबरोबर जा आणि सुखानं रहा. महंतांच्या सावलींत तूं इतकीं वर्षं राहिलेली आहेस. त्यांच्या सहवासांत तुझ्या अंतःकरणाची घडण झालेली आहे. तुला अमुक कर व करूं नकोस हें मीं सांगायचं खरोखरी कारण नाहीं. डोंगरांतून उतरणारी नदी आपला मार्ग आपणच शोधून काढते. तिच्या पाठीशीं तो डोंगर नेहमीं उभा असतो, ती कितीहि दूर गेली तरी मस्तक अंतराळांत वर करून तो तिच्याकडे पहात असतो; नवीन पाण्याच्या रूपानें आपला जीवनांश तिला सतत पाठवीत असतो. महंतांचें तपोबल अशीच तुझी सदैव पाठराखणी करीत राहील. त्यांची माया सतत तुझ्याभोंवतीं वज्राप्रमाणें उभी राहील. शिवास्ते पंथानः सन्तु ! ही केवळ माझी सदिच्छा नाहीं, तर महंतांचीहि, तुला आपल्या कुशींत खेळविणाऱ्या या रणकालीच्या डोंगराची, येथील सर्व दैवतांची !"

● ● ●

चित्रकार येतांच वसुदेव त्याला घेऊन गडावरती गेला आणि तासाभरांत ते दोघेहि पुन्हां खालीं परत आले. चित्रकारानें आपलें सर्व सामान बरोबर आणलें. जान्हवीचेहि कपडे वगैरे आवश्यक साहित्य वसुदेवानें त्याच्या ट्रंकेंत भरलें होतें. वसुदेवानें चित्रकारास सारें कांहीं सांगितलें होतें.

पायथ्याशीं येतांच चित्रकार जान्हवीकडे पाहून हंसत म्हणाला, "या डोंगरावर चित्रं काढण्यासाठीं मी आलों खरा, पण इतकं सुंदर चित्र मी बरोबर घेऊन जाईन अशी मला कल्पना नव्हती !"

"रणकालीची कन्या आहे ही !" वसुदेव म्हणाला, "या चित्राच्या अंत:करणांत फार मोठं तेज जागृत आहे याचा मात्र विसर होऊं देऊं नका."

"मी अंधारांत चित्र काढूं लागलों किंवा चित्र काढतां काढतां अंधार पडला म्हणजे या तेजांतून मला प्रकाशाचा लाभ होईल. होय ना जान्हवी ?"

जान्हवीला कांहींच बोलणें शक्य नव्हतें. तिनें चित्रकाराकडे डोळे उचलून एकदां पाहिलें मात्र. एका जीवनाचा दरवाजा ती बंद करीत होती आणि दुसऱ्याच्या उम्बरठ्यावर पाऊल टाकीत होती. अज्ञाताच्या प्रदेशांत प्रवास करण्यासाठीं ती सिद्ध झाली होती. दु:ख, सुख, भीति, आशा, वगैरे विविध भावनांचें वादळ तिच्या मनांत उफाळलें होते.

"चला. तुम्हांला निघालं पाहिजे. सूर्यास्त झाला आहे. अंधार पडण्यापूर्वीं तुम्हांला शेलारवाडीला पोहोंचलं पाहिजे. तिथें तुम्हांला आज तावडतोब नाशिकची गाडी मिळेल. जान्हवी—"

वसुदेवाचा गळा भरून आला होता. त्याला अधिक बोलवलें नाहीं. जान्हवी पुढें झाली आणि वसुदेवाच्या पायांवर डोकें ठेवून तिनें त्याचा निरोप आणि आशीर्वाद घेतला. ती पुन्हां उठून उभी राहिली तेव्हां तिच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वहात होत्या. तें पाणी पुसण्याचा प्रयत्न न करतां ती ओल्या दृष्टीनेंच क्षणभर वसुदेवाकडे पहात स्वस्थ उभी राहिली. बोलणें अशक्य होतें व अनावश्यकहि होतें. अंत:करणांतील भावनांचा आवेग शब्दांतून व्यक्त होण्यासारखा नव्हता.

परंतु अेक प्रश्न विचारणें आवश्यक होतें, तो जान्हवीनें विचारला.

"बाबा घरीं आले का ?"

" अजून आलेले नव्हते; आतां आले असतील. मला लवकर परत गेलं पाहिजे," वसुदेव उत्तरला.

" त्यांची नीट काळजी घ्याल ना ? त्रास करून घेतील ते स्वतःला ! माझा निरोप सांगा त्यांना, मी रागावलें नाहीं.. "

माधवी कशीबशी बोलली. तिचे ते शब्द गळ्यांतून नव्हे, तर जणूं तिच्या डोळ्यांतील अश्रूंतूनच बाहेर पडत होते.

" सांगेन ! तूं बाबांची चिंता करूं नकोस—"

" आणि तुम्ही—"

" माझीहि करूं नकोस ! तूं गेल्यामुळें घर रिकामं–सुनं होईल. त्यांतला आनंद व उल्हास ओतून दिल्यासारखं होईल. पण आम्ही संन्यासी आहोंत, अशीं दुःखं आम्हांला पचवलींच पाहिजेत..जा आतां.."

वसुदेव कितीतरी वेळ त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात उभा होता. सूर्यास्तानंतर पश्चिमेच्या आकाशांत सोनेरी व जांभळ्या रंगाचे अगणित पुष्पसंचय जागोजाग पडले होते. ते दोन प्रवासी त्या राशींकडे, विविध रंगांच्या त्या दिव्य उन्मेषांकडे मार्गक्रमण करीत होते. त्या कृष्णाकृति दिसेनाशा होतांच वसुदेव माघारीं वळला.

● ● ●

# १४

वसुदेव मारुतीच्या देवळाजवळील घळई चढूं लागला, तेव्हां दिवे लागणीची वेळ होऊन गेली होती. रणकालीचा रस्ता त्याच्या पायाखालचा होता आणि डोंगर चढण्याउतरण्याची त्याला चांगली संवयहि झाली होती. तरीहि एका दिवसांत तीनचार वेळां चढउतार करणें सोपें नव्हतें. तो जान्हवीचा निरोप घेऊन गड चढूं लागला तेव्हां त्याचे पाय शिणलेले होते, शरीर थक-लेलें होतें. शक्य तों लौकर मठांत जाऊन पोहोंचणें फार अवश्य होतें. महंत कोणत्या मनस्थितींत असतील आणि कोणत्या क्षणीं घरीं परततील याचा नेम नव्हता. अशा वेळीं कोणी तरी त्यांच्याजवळ असणें जरूर होतें. गडावरती वेगानें जाण्याची ही निकड वसुदेवास तीव्रतेनें वाटत होती. परंतु गडावर

नेहमीपेक्षां अधिक ये–जा करून थकलेले पाय, शरीराचें ओझें वाहून नेण्यास फारसे उत्सुक नव्हते. मोठ्या कष्टानेंच प्रत्येक पाऊल उचलीत तो वरती चालला होता.

शरीराप्रमाणेंच त्याचें मनहि फार कष्टी झालें होतें. स्नेहपाशांच्या व सुख-दु:खांच्या पलीकडे जाऊन, बुद्धीला संमत होणारें कर्तव्य आपण करीत रहावें हा पाठ त्यानें आत्मसात् केला होता. अभिनंदन जीवनाचेंहि करूं नये, व मरणाचेंहि करूं नये अशी विरक्त वृत्ति त्याच्या ठिकाणीं स्थिर होऊं लागली होती. तरीहि जान्हवीची पाठ वळल्यावर, त्याच्या डोळ्यांत इतर संसारी माणसांप्रमाणेंच दु:खाचें पाणी तरारल्याशिवाय राहिलें नाहीं. तो गडावरती आल्यापासून जान्हवीचा स्नेहमय आणि उत्साहदायक सहवास त्याला मिळाला होता. ज्या दिवशीं दाराजवळच्या अंगणांत जान्हवीला रांगोळी घालतांना त्यानें पाहिलें, तेव्हांपासून आतांपर्यंत तिच्याविषयीं वसुदेवास उत्कट प्रेम वाटत होतें. जान्हवीचेंहि प्रेम करण्याचें सामर्थ्य फार मोठें होतें. तो गडावर आल्या दिवसापासून आपल्या नि:स्वार्थ व अपार प्रेमाचा कोश तिनें त्याच्या जीवनाभोंवतीं रचून ठेवला होता. हें सारें जान्हवी निघून जातांच नाहीसें झालें होतें. सकाळपासून संध्याकाळपर्यंत, जान्हवीच्या स्वरूपांत, जीवना-मधील आनंद, कोमलता व स्नेह हे मधुर भाव त्यांच्या भोंवतीं खेळत रहात. निर्मळ पाण्याच्या तरंगांप्रमाणें असलेलें तिचें हास्य व लाघव त्यांच्या सभोंवार पसरत राही. महंतांच्या आणि त्याच्या संन्यस्त आयुष्यक्रमांत अपरिहार्य आवश्यकता अशी कसलीच नव्हती. पण जें गेलें तें मोलाचें होतें यांत शंका नाहीं. साक्षात् विरक्ततेनेंहि आपला स्वभावधर्म विसरून, ओल्या डोळ्यांनीं कासावीस होऊन पहावें असें सुख होतें तें. वसुदेवास वाटलें, आपण घरामध्यें पाऊल टाकतांच त्याच्या चारी भिंती राक्षसिणींप्रमाणें आपल्याला खायला उठतील ! केवढा सुनेपणा भरला असेल तिथें !

परंतु या विचारांहूनहि त्याला अधिक व्यथित करणारे विचार महंतां-बद्दलचे होते. जें झालें तें इतकें अनपेक्षित व अचानक होतें कीं त्यासंबंधीं विचार करतांना बुद्धि बधिर होऊन जात असे. महंतांनीं जान्हवीजवळ केलेली आपल्या वर्तनाची मीमांसा तिनें वसुदेवास सांगितली होती. परंतु तेवढ्यानें त्याचें समाधान होत नव्हतें. किंबहुना त्यांच्या वर्तनाची केवळ

तात्त्विक चिकित्सा करण्याइतकें त्याच्या मनाला स्वास्थ्यहि नव्हतें. त्या आघातामुळें निर्माण झालेलें निराकार वादळ गर्जना करीत त्याच्या मनामध्यें पिसाटासारखें घोंगावत होतें. गडावरती वेगानें जाऊन आपण महंतांची भेट घेतली पाहिजे एवढा एकच विचार त्यांत निश्चित स्वरूपाचा होता.

● ● ●

परंतु वसुदेवाची ही इच्छा पुरी झाली नाहीं. महंतांची व त्याची पुन्हां कधींहि भेट होऊं शकली नाहीं !

तो घळईतून चढण चढत असतांच एक कोकणी गुराखी वरतून धांवत खालीं आला.

सभोंवार सर्वत्र अंधार पसरला होता. खालीं कांहीं अंतरावर, मारुतीच्या देवळांत एक दिवा जळत होता व त्याचे क्षीण प्रकाशकिरण त्या डोंगराच्या कांहीं भागावर फडफडत होते.

त्या अंधुक उजेडांत वसुदेवास वरून कोणी तरी धांवत पळत खालीं येत असल्याचें जाणवलें.

त्यानें विचारलें, " कोण आहे ?"

वसुदेवाचा ओळखीचा आवाज ऐकतांच तो गुराखी एकदम थांबला व वसुदेवाजवळ येऊन उभा राहिला. गडावरती नेहमीं ये-जा करणारा एक कोकणी होता तो.

" काय रे शिवा, असा धांवतोस कां ? " वसुदेव उद्गारला.

शिवा धापा टाकीत उत्तरला, " वरती चला लौकर ! मठाला आग लागली आहे ! सारं घर गवताच्या गंजीप्रमाणें पेटून उठलं आहे ! "

" आणि महंत कुठं आहेत ? "

" बाबा—"

" कुठं आहेत ? " वसुदेव बेभान होऊन ओरडला.

" जाळामध्यें कुणा तरी माणसाची हालचाल दिसली मला ! "

वसुदेव शिवाला बरोबर घेऊन धांवतच वर चढूं लागला. अर्ध्या तासांत ते मठापर्यंत जाऊन पोहोंचले.

परंतु त्याच्या जाण्याचा कांहींहि उपयोग झाला नाहीं.

जें दिसत होतें तें तटस्थ डोळ्यांनीं पहाण्यावांचून दुसरें कांहींहि करतां येणें शक्यतेच्या कोटींतील नव्हतें.

महंताचा तो सारा आश्रम धगधगून जळत होता. ते ग्रीष्माचे, अग्नीच्या अधिराज्याचे दिवस होते. आपल्या अक्राळविक्राळ, तांबड्यालाल जिभा पसरून अग्नी त्या घराचें अधाशीपणानें भक्षण करीत होता.

वसुदेव स्तब्ध उभा राहून समोरच्या दृश्याकडे अविचल दृष्टीनें पहात राहिला.

मठाचें बांधकाम जुन्या लांकडांचें व खंबीरपणाच्या दृष्टीनें साधारणांतच जमा होणारें होतें. अंगणाजवळचें पर्णगृह तर सपूर्णतः कोसळून भस्मसात् झालें होतें. जळून कोळसा होत असलेल्या बांबूंची, वाशांची व पानांची अेक मोठी थोरली रास तेथें तडतडत होती. खुद्द घराची इमारतहि नष्टप्राय होण्याच्या मार्गास लागली होती. छप्पर आंतल्या बाजूस अर्धवट कोसळून पडलें होतें व भिंतीहि खचूं लागल्या होत्या. इमारतीचे सर्व भाग अखेरचा नाश होण्यापूर्वी परस्परांकडे धांव घेऊन अेकमेकांना मिठ्या मारीत आहेत असा भास होत होता. त्यांच्या त्या संमिश्र समुदायांतून उसळणाऱ्या केशरी लाल ज्वाला अग्निनारायणाच्या ध्वजांप्रमाणें मोठ्या दिमाखानें आकाशांत फडफडत होत्या ! त्यांचा दिमाख अनाठायीं नव्हता. त्यांनी जें गिळलें होतें त्याचें मोल, जगाच्या दृष्टीनें कितीहि असो, वसुदेवाच्या दृष्टीनें मात्र तें अपरिमित होतें !

आपल्या असामान्य जीवनावर, उसळत्या ज्वालांचें आवरण घालून घेणाऱ्या महंतांच्या न दिसणाऱ्या मूर्तीला त्यानें भाविकपणें अखेरचें अभिवादन केलें.

महंतांनीं घराला आग लावून, त्या आगींत स्वतःस जाळून घेतलें याबद्दल वसुदेवास मुळींच शंका नव्हती. थोडीफार असलीच तर ती दुसऱ्या दिवशीं दूर झाली.

महंतांच्या आसनस्थ मूर्तीचे अवशेष त्या कोळशाच्या ढिगारांत आढळून आले.

त्याच दिवशीं सायंकाळीं वसुदेवानें रणकालीचा त्याग केला.

● ● ●

# १५

त्या वृद्ध यतीनें आपली गोष्ट* संपवली तेव्हां मध्यरात्र टळून गेली होती. आधींच शांत असलेल्या त्या डोंगरमाथ्यावर सर्वत्र अथांग शांतता पसरली होती. आकाशांत शिखरावर आलेल्या चंद्राचें शुभ्रकोमल चांदणें त्या शांत वातावरणावर एक झिरझिरीत, रुपेरी आच्छादन पसरीत होतें.

संन्यासी सांगत असलेल्या कथेच्या प्रवाहांत आम्ही सर्वजण इतके तल्लीन होऊन गेलों होतों कीं, कोठलेंहि भान आम्हांला उरलें नव्हतें. परंतु तरीहि एक गोष्ट आम्हां सर्वांच्या ध्यानांत येऊन चुकली होती. ती म्हणजे, उध्वस्त मठामध्यें आज दिवा लावण्यासाठीं आलेला हा यति म्हणजे खुद्द वसुदेवच ही होय. वसुदेवाच्या तोंडूनच आम्ही हा कथाभाग ऐकला होता

निवेदन संपल्यावरती कांहीं वेळ कोणीच बोललें नाही. पाण्यांतून बाहेर पडल्यावरतीहि अंग भिजलेलें रहावें त्याप्रमाणें त्या गोष्टीचे विविध संस्कार आमच्या मनात बराच वेळ ठिपकत राहिले.

कांहीं वेळ वाट पाहून तो संन्यासीच म्हणाला,

"जान्हवीचं जान्हवी हें नांव एका दृष्टीनं सार्थ झालं. रणकालीच्या या निर्जन स्वर्गामध्यें तिच्या कर्तृत्वाला व विकासाला पुरेसा वाव नव्हता. पाण्याचा व सुजनतेचा ओढा नेहमीं खालच्या पातळीकडे असतो. गंगा स्वर्गांतून पृथ्वीवर आली हा योगायोग नव्हे; पृथ्वीवरच तिच्या अवतार-कार्याला अवसर होता. महंतांच्या छायेंत जान्हवीच्या आंतरिक सामर्थ्याचा विकास पुरेसा कधींच होऊं शकला नसता. तिनें समाजाला एक फार मोठा कलावंत मिळवून दिला. तुम्ही * * * यांचं नांव ऐकलं असेल!"

"हो!" आम्ही उद्गारलों. स्वदेशांतच नव्हे, तर परराष्ट्रांतहि कीर्ति मिळविणाऱ्या एका चित्रकाराचें नांव होतें तें.

"हाच तो चित्रकार!" संन्यासी म्हणाला, "त्याच्या स्वैर, स्वच्छंदी

* ही गोष्टच आतापर्यंत लेखकानें पुनर्निवेदित केली. हें पुनर्निवेदन करतांना अर्थात् बरेंचसें स्वातंत्र्य त्यास घ्यावें लागलें आहे.

आयुष्यांत जान्हवीचा प्रवेश झाला नसता तर तो इतक्या मोठ्या पदवीला चढला असता कीं नाहीं याची शंका आहे. त्यांचा विधियुक्त विवाह झाला नाहीं, परंतु तिनें त्याचें जीवन खरोखरच प्रकाशमय केलें. श्रेष्ठ कलावंत रूढ परंपरांचे उंबरठे ओलांडून नेहमीं बंधनातीत होण्याचा प्रयत्न करीत असतो. ही त्याची वृत्ति सुरक्षित ठेवूनहि त्याच्या सभोंवार सुखाचं कोंदण निर्माण करणारी प्रेयसीच त्याचं जीवन समृद्ध व कृतार्थ करूं शकते. जान्हवीनें हें कार्य केलं."

"या हकीगतीमधील वसुदेव ते आपणच ना?" एकानें जिज्ञासा अनावर होऊन विचारलें.

"या हकीगतींतला वसुदेव तो मीच हें खरं आहे! महंतांचा पार्थिव देह नाहींसा झाल्यानंतर मी या डोंगरावरूनच नव्हे, तर या मुलखांतूनहि दूर गेलों! माझ्या संन्यस्त जीवनाचा मीं कधीं त्याग केला नाहीं. मध्यंतरीं गेलेला काळ कांहीं कमी नव्हे. या काळांत खूप स्थित्यंतरें झालीं आहेत. परिस्थिति झपाट्यानें बदलली व सारखी बदलत आहे. माझ्या यतिधर्मांत फरक पडला नसला तरी विचारांत पडला आहे. परंतु तरी महंतांनीं जो प्रकाश मला एकदां दाखविला तो अद्यापहि मला पुरतो आहे, अद्यापहि माझा मार्ग उजळ करतो आहे!– म्हणूनच मी कुठेंहि असलों तरी या पुण्यतिथीच्या दिवशीं भाविक यात्रेकरू-प्रमाणें येथें येतों आणि या भग्न वास्तूची पूजा करतों. महंतांच्या अखेरच्या वर्तनाचा न्यायनिवाडा तुम्ही कसाहि करा, परंतु त्यांचें व्यक्तित्व असामान्य होतें ही गोष्ट तुम्हांला स्वीकारावीच लागेल. माझ्या मनावर तर त्याचा पगडा इतका जबरदस्त आहे कीं, आज इतक्या वर्षांनंतर, या रणकालीच्या उभ्या पहाडाकडे बघितलं म्हणजे महंतच विशाल स्वरूप धारण करून इथें उभे आहेत असा मला भास होतो."

"परंतु महंतांच्या अखेरच्या वर्तनाचा न्यायनिवाडा तुम्ही स्वतः कसा करतां?" अेकानें विचारलें.

"न्यायनिवाडा करण्याचा अधिकार मला आहे कीं नाहीं कुणास ठाऊक!" संन्यासी उत्तरला. "त्यांच्या महात्मतेचं जें मला दर्शन झालं तें इतकं उज्ज्वल आणि जवळून झालेलं होतं कीं, अेखाद्या अपराधाबद्दल त्यांना दोष देण्याचं कधीं माझ्या मनांतहि येणार नाहीं!"

"जान्हवीसंबंधींचं त्यांचं वर्तन म्हणजे त्यांचा अधःपातच नव्हता का ?" मीं विचारलें.

"तुम्ही मंडळी नव्या युगांतील आहांत," संन्याशी म्हणाला, "मीहि जुन्या काळांतील असलों तरी नव्या विचारांचा व ज्ञानाचा परिचय करून घेण्याचा सतत यत्न करीत असतों. अधःपाताविषयींच्या कल्पना सध्यां बदलत आहेत, मर्यादित होत आहेत ! शरीराप्रमाणेंच मनहि आतां शास्त्रज्ञांच्या व संशोधकांच्या मेजावर पडलें असून, त्याच्या गुणधर्मांचे आणि प्रगतिपरागतीचे नवेनवे सिद्धांत मांडले जात आहेत. शरीराप्रमाणें मनालाहि व्याधी असतात. शरीरास आजार होणें हा जर माणसाचा अधःपात मानला जात नाहीं, तर मनास आजार होणें ही गोष्ट तरी तशी कां मानली जावी असा प्रश्न आतां उपस्थित झाला आहे. महंतांनीं आपलं सारं आयुष्य खडतर तपश्चर्येंत व देहदंडनांत घालविलं. तारुण्याच्या पहिल्या भरांत ते क्रांतीच्या कटाकडे आणि त्यानंतर यतिधर्माकडे वळले. त्या काळांत सर्व देशभर, विशेषतः बंगालमध्यें ही नवी लाट उसळली होती. महंत बंगालमध्यें कांहीं वर्षें होते. तेथेंच त्यांनीं त्या वृत्तीचा स्वीकार केला व आपल्या कार्यासाठीं व चिंतनासाठीं हा प्रांत निवडून ते येथें राहिले. या सर्व काळांत, त्यांच्यांतील शरीरवासना सतत दडपल्या गेल्या. समाजसेवेच्या व परमार्थचिंतनाच्या आवरणाखालीं त्या बद्ध होऊन राहिल्या हें खरें; परंतु स्वतःचा शेवट होतांना त्यांनीं मुक्ततेसाठीं निकराचा प्रयत्न केला व स्वतःबरोबर महंतांचाहि शेवट केला ! मनाप्रमाणें महंतांचें शरीरहि बलशाली होतें, शरीरस्थ वृत्तीहि बलशाली होत्या. महंतांच्या आंतरिक संग्रामाची यथार्थ कल्पना कोणालाच येणार नाहीं. मीं जी माहिती सांगितली, ती जान्हवीनं मला जेवढं सांगितलं तेवढ्याच्या मर्यादेंतच; परंतु त्यांच्या अंतरांतील हा संग्राम फार भीषण असला पाहिजे. अग्नि आणि पाणी या मूलतत्त्वांच्या संग्रामासारखा तो असला पाहिजे ! या संग्रामाची अपरिहार्य अखेर म्हणजे उभयतांचा नाश; म्हणून महंतांची आत्महत्या अपरिहार्य होती. ज्या तत्त्वज्ञानाचं त्यांनीं आयुष्यभर पूजन-पालन केलं त्याच्यावरची त्यांची निष्ठा नाहींशी झाली होती आणि नवीनाचा स्वीकार केवळ शशंकतेनेंच होत होता ! आपण सर्वस्वीं पराभूत होत आहोंत असें त्यांना वाटणें अपरिहार्य होतें. मानसिक प्रवृत्तींची चिकित्सा आपण आज थंड माथ्यानें

करीत असलों तरी महंतांकडून तशी ती होणं सर्वस्वीं अशक्य होतं. त्यांचं जीवन श्रद्धामय होतं. या बाबतींत निराधारता येतांच त्यांनीं स्वतःच्या आयुष्याचा शेवट करून घेतला."

"परंतु ज्या शारीरिकतेकडे ते वळले होते तिचा पूर्ण स्वीकार करून ते सुखानं जगूं शकले नसते का ?" आमच्यापैकीं एकजण म्हणाला.

"तें अशक्य होतं" संन्यासी उत्तरला, "शारीरिकतेनें त्यांना जिंकण्याचा प्रयत्न केला, विजयहि मिळविला. परंतु तो संपूर्ण विजय नव्हता. शरीर आपल्याला पराभूत करीत आहे असं पाहतांच त्यांनीं शरीराचाच नाश केला! रजपूत स्त्रिया, पराभवानंतर आपण शत्रूच्या हातीं सांपडूं नये म्हणून स्वतःला जाळून घेत ना? तसाच प्रकार झाला इथें. शिवाय, जीवन हें महंतांच्या दृष्टीनं केवळ साधनस्वरूप होतं. तें निरुपयोगी झाल्यावरहि जतन करून ठेवण्याइतके ते प्रवाहपतित अथवा धैर्यहीन नव्हते. म्हणून मी म्हणतों कीं, महंतांचें जीवन जसें मोठें तसें त्यांचें मरणहि मोठें!"

